*भारताच्या एकराष्ट्रीयत्वाला अनेक बाजूंनी आव्हाने उपस्थित झाली आहेत. भारत पूर्वी कधीतरी एक-राष्ट्र होते का, आणि पुढे एक-राष्ट्र राहू शकते का, हे प्रश्न आपल्यापुढे उपस्थित झाले आहेत. एकराष्ट्रीयत्वाची निर्मिती कोणत्या बैठकीवर आधारून करावी, 'सर्वधर्मसमावेशक' व 'हिंदुत्ववादी' यांपैकी कोणती भूमिका राष्ट्रनिर्मितीच्या संदर्भात योग्य आणि व्यवहार्य आहे, भारतीय राष्ट्रबांधणीचा घाट कोणता असावा इत्यादी प्रश्नांची चर्चा मोकळेपणाने होणे आज निकडीचे आहे.*

## भारताचे एकराष्ट्रीयत्व - भ्रम, वास्तवता आणि भवितव्य

- १ -

भारताचे एकराष्ट्रीयत्व आपण अलिकडच्या अनेक वर्षामध्ये गृहीत धरूनच चाललो होतो. पंजाबमधील अलिकडील घटनांमुळे या गृहीताला मोठा धक्का पोचला आहे. मुस्लिम समाज व काही प्रमाणात ख्रिश्चन समाज यांच्या राष्ट्रनिष्ठेविषयी आमच्या मनात आशंका राहत आली आहे; शीख समाजाविषयी दोन वर्षांपूर्वीपर्यंत आम्ही निःशंक होतो. परदेशातील काही शीख व्यक्तींनी 'खालिस्तान'ची मागणी केली, स्वतंत्र शीख राष्ट्राच्या निर्मितीची आकांक्षा प्रकट केली त्यावेळीदेखील, चार माथेफिरू मंडळींची आचरट बडबड, असेच आम्हांला वाटले. पाहता पाहता भिंडरांवाले यांचा उत्कर्ष झाला आणि अकाली दल व भिंडरांवाले यांनी शिखांच्या कर्मनिष्ठेला उग्र कडवा वळसा दिला. 'शीख हा हिंदुधर्मातीलच वेगळा पंथ नसून तो एक स्वतंत्र धर्म आहे' हे शिखांचे आधीपासून म्हणणे होते. आता, शीख हे एक स्वतंत्र राष्ट्रही आहे ही आकांक्षा नव्याने उत्पन्न झाली व पसरली. अल्पावधीत राष्ट्रसत्तेच्या सार्वभौमत्वाला आव्हान उपस्थित करण्यापर्यंत त्यांची मजल गेली. सरतेशेवटी शीख दहशतवाद्यांना आळा घालण्यासाठी सुवर्णमंदिर भारतीय सैन्याला ताब्यात घ्यावे लागले. सुवर्णमंदिराच्या मोहिमेचे नेतृत्व शीख सेनापतींनी केले, आणि सैन्यातल्या शिखांनी मोठ्या प्रमाणावर बंडाळी केली नाही या दोन्ही गोष्टी दिलासा देणाऱ्या असल्या तरी, घटना वेगाने घडत आहेत आणि एकराष्ट्रीयत्वाला असलेले आव्हान आजच्यापेक्षाही जास्त तीव्र बनेल अशी चिन्हे आहेत.

भारतीय एकराष्ट्रीयत्वाच्या प्रश्नाची एक ऐतिहासिक पार्श्वभूमी आहे. 'आम्ही हिंदुस्थानवर एकछत्री अंमल प्रस्थापित करण्याआधी हिंदुस्थान हे एक राष्ट्र कधीच नव्हते; ते आम्हीच निर्माण केले आणि आम्ही सत्ताधारी असेपर्यंतच ते टिकणार आहे,' असे ब्रिटिश राज्यकर्ते म्हणत. त्यांच्या प्रतिपादनातला पूर्वार्ध स्वीकारून, भारतीय राष्ट्रसभेच्या (काँग्रेसच्या) संस्थापकांनी येथे राष्ट्रनिर्मितीची प्रक्रिया सुरू केली. हिंदुस्थानच्या ज्या चतुःसीमा ब्रिटिशांनी प्रस्थापित केल्या होत्या त्याच राष्ट्राच्या सीमा आहेत असे गृहीत धरून, या सीमांमधील विविध धार्मिक व वांशिक सांस्कृतिक समूहांमधून एकात्म राष्ट्राची बांधणी करण्याचे काम त्यांनी हाती घेतले.

कालांतराने काँग्रेसच्या या भूमिकेचा प्रतिवाद करणाऱ्या भूमिका व आणि राजकीय संघटना पुढे आल्या. 'या देशात प्राचीन काळापासून हिंदूंचे एक-राष्ट्र अस्तित्वात आहेच; मध्यंतरीच्या मुसलमानी आणि आताच्या ब्रिटिश परकीय राज्यामुळे या आर्य सत्यावर काजळी चढली; बलशाली होऊन पुनरपि हिंदुराष्ट्राचे पुनरुत्थान करण्याचे कार्य हिंदूंना पार पाडावयाचे आहे,' अशी एक हिंदुराष्ट्रवादी भूमिका मांडली गेली. हिंदुमहासभा ही राजकीय संघटना १९३० नंतरच्या काळात स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या नेतृत्वाखाली या भूमिकेतून राजकारणात विशेष सक्रिय झाली. 'धर्मभेद हा वस्तुतः राष्ट्रभेदही आहे, येथील मुसलमान समाजाची हिंदूंबरोबर एकाच राज्यसत्तेखाली राहण्यास हरकत नाही, पण ते एक वेगळे राष्ट्र आहे यास मान्यता असली पाहिजे; व त्या आधारे योग्य ते स्थान मुस्लिम समाजास राज्यसत्तेमध्ये मिळाले पाहिजे,' या आशयाची मांडणी काही मुस्लिम नेत्यांनी एकोणिसाव्या शतकातच केली. मुस्लिम लीगच्या राजकारणाची आरंभापासूनच ही बैठक राहिली. १९४० च्या सुमारास स्वतंत्र 'पाकिस्तान' राष्ट्राची मागणी पुढे करून लीगने आपले राजकारण अधिकच उग्र बनविले. शीख समाजाच्या पुढाऱ्यांनी 'हिंदू व मुस्लिम जमातींहून स्वतंत्र अशी आमची जमात आहे' अशी भूमिका घेऊन पंजाबात दीर्घकाळ राजकारण केले. धर्माच्या मुद्द्यावर हिंदू समाजापासून आपले अलगपण जसे मुसलमान, शीख व ख्रिश्चन या समाजांनी सांगितले तसा जातिभेदाच्या मुद्द्यावरून 'ब्राह्मणेतरां'नी व अस्पृश्यांनी आपल्या वेगळेपणाचा आग्रह धरला आणि काँग्रेसपासून फटकून राहून राजकारण केले.

तात्पर्य असे की, ज्या पायावर काँग्रेसने एकराष्ट्राच्या निर्मितीचा उद्योग साठ वर्षे केला तो पाया नाकारणाऱ्या प्रतिवादी भूमिका स्वातंत्र्यपूर्वकाळीच क्रियाशील होत्या. स्वातंत्र्य मिळाले त्या वेळी काँग्रेसच्या हाती सत्ता आली आणि दीर्घकाळपर्यंत काँग्रेसचा देशावर एकछत्री अंमल चालू राहिला, त्यामुळे काँग्रेसच्या भूमिकेला व कार्याला प्रतिवादी भूमिका व कार्य आजतागायत अस्तित्वात आहेत, राष्ट्रात पुष्कळ फुटीरपणा शिल्लक राहिलेला आहे व एकराष्ट्रीयत्वाची निर्मिती पूर्णत्वाला गेलेली नाही या वास्तवाकडे दुर्लक्ष झाले.

भारतात एकराष्ट्रीयत्व निर्माण करण्याची प्रक्रिया अद्यापही अधुरी राहिलेली आहे याचे भान भिवंडीच्या दंगलींमुळेही तीव्र झाले आहे. पाकिस्तानच्या निर्मितीच्या पार्श्वभूमीवर आजवर सामान्यतः असे गृहीत धरले गेले की येथील मुसलमान समाज भारताशी पूर्णपणे एकनिष्ठ होऊ शकलेला नाही, व अधूनमधून होणाऱ्या जातीय दंगली हा याच वस्तुस्थितीचा आविष्कार असतो. हे गृहीत खरे तर पूर्वीही बरोबर नव्हते. पण दंगली हा हिंदूंच्या एका प्रकारच्या 'राष्ट्रवादा'चाही आविष्कार असतो ही गोष्ट अलीकडे भिवंडीच्या दंगलींमुळे चांगल्या प्रकारे स्पष्ट झाली. एकराष्ट्रीयत्वाची बैठक काय असावी याविषयी हिंदू समाजात भिन्न व परस्परविरोधी भूमिका आजही क्रियाशील आहेत असा बोध यावरून होतो. एकराष्ट्रीयत्वाच्या प्रश्नाची चर्चा करताना येथील जहाल मतवादी वा आंबेडकरी दलितांचे विस्मरण होऊ देता उपयोगी नाही. 'आम्ही हे राष्ट्र आमचे का म्हणावे; राज्यघटना व ध्वज यांचा सन्मान का करावा,' असे प्रश्न गंभीरपणे त्यांच्यातील ज्येष्ठ-तरुण, विशेषतः तरुण पुढारी वेळोवेळी उपस्थित करतात. 'ज्याच्याशी एकात्म व्हावे असे हे राष्ट्र नाही' असेही त्यांना म्हणायचे असते आणि 'या राष्ट्राच्या एकात्मतेची बैठक कोणती राहणार आहे' असा प्रश्नही त्यांना उपस्थित करावयाचा असतो. भारताच्या एकराष्ट्रीयत्वाला इतरही बाजूंनी अधूनमधून आव्हान उपस्थित झालेले आहे, व भविष्यात होण्याचीही शक्यता दिसते. हिंदी ही देशाची राजभाषा करण्याच्या मुद्द्यावरून दक्षिणेकडील राज्यांनी भारतामधून फुटून निघण्याची भाषा एकेकाळी केलेली होती. आज राज्ये अधिकाधिक स्वायत्ततेची मागणी करीत अहात. प्रांतिक पक्षांचा उत्कर्ष होताना अलगपणावर (उदाहरणार्थ 'तेलगू देसम्') भर दिला जात जाहे. आसाममध्ये गेली चारपाच वर्षे आंदोलन चालू आहे. या राष्ट्राशी बांधून राहावे असे आणखी किती काळ त्यांना वाटेल? काश्मीर, नागभूमी, मिझोराम, अशी काही राज्ये वा प्रदेश आहेत, की ज्यांना कमीअधिक प्रमाणात लष्कराच्या जोरावरच आपण भारतात राखलेले आहे. आज अखिल भारतीय पक्षांमध्येही वरिष्ठ पातळीवरील किती नेत्यांच्या ठिकाणी खोलवर रुजलेली राष्ट्रनिष्ठा आहे याची शंका उप्तन्न व्हावी अशी परिस्थिती आहे. राष्ट्रसत्तेशी सैन्याची असलेली निष्ठा आज गृहीत धरता येते; पण भविष्यात जर यापेक्षा वेगळी परिस्थिती उत्पन्न झाली आणि केंद्रात निर्नायकी अवस्था आली तर एकराष्ट्र म्हणून भारत टिकेलच अशी खात्री आपण खरोखरच आज बाळगू शकतो का?

‘भारत हे कधीतरी एक-राष्ट्र होते का— होऊ शकते का?' हा प्रश्नही आज आपणासमोर उपस्थित झाला आहे असे मानले पाहिजे. एकराष्ट्रीयत्वाची निर्मिती कोणत्या बैठकीवर होऊ शकते वा करणे योग्य आहे, 'सर्वधर्मीय' व 'हिंदुत्ववादी' या एकराष्ट्रीयत्वासंबंधातल्या मुख्य दोन भूमिका. त्यांपैकी कोणती अधिक व्यवहार्य व योग्य आहे, एकराष्ट्रीयत्वाच्या निर्मितीची प्रक्रिया दीर्घ प्रयत्नांनंतरही अपुरीच का राहिली वा अयशस्वी का ठरली, तिची योग्य प्रक्रिया कोणती, आणि भारतीय राष्ट्रबांधणीचा घाट कोणता असावा, या साऱ्या प्रश्नांची मोकळेपणाने चर्चा व्हावयास हवी आहे. ती आजची निकड आहे.

भारताच्या चतुःसीमांमधील सर्व विविध जातीजमातींचे मिळून एक राष्ट्र' घडविण्याची काँग्रेसची भूमिका, व 'पूर्वापार हे हिंदूंचेच राष्ट्र आणि हिंदुत्ववाद हीच या देशात पुनरपि उत्थापित करावयाच्या राष्ट्रीयत्वाची एकमेव बैठक' ही हिंदुराष्ट्रवादी भूमिका या दोन परस्परविरोधी भूमिका भविष्याच्या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत. हिंदू समाज हा येथील बहुसंख्याक समाज व 'मुख्य प्रवाह' असल्याने या दोहोंपैकी कोणत्या भूमिकेची निवड राष्ट्राच्या उभारणीसाठी त्याच्याकडून केली जाते याचेच मुख्यत्वेकरून दूरगामी परिणाम होणार आहेत म्हणून या ठिकाणी त्यांचाच तेवढा विशेषत्वाने विचार केला आहे.

- २ -

आधुनिक अर्थाने 'राष्ट्र' ही संकल्पना युरोपीय आहे आणि ब्रिटिशांच्या राज्याबरोबर ती आपल्या देशातील नवशिक्षितांपर्यंत

पोचली; तिच्या प्रभावाखाली ते आले. फ्रान्स हे 'राष्ट्र'का म्हणायचे? तर, फ्रान्सच्या सीमांमध्ये राहणारी माणसे 'आम्ही फ्रेंच आहोत' अशी आपली ओळख देतात, 'फ्रान्स हे आमचे राष्ट्र आहे' अशा प्रकारे राष्ट्राशी आपली भावनात्मक एकरूपता व्यक्त करतात, आणि फ्रान्समधील प्रस्थापित राष्ट्रसत्ता हा राष्ट्रक्याचा आविष्कार, राष्ट्रैक्याचे प्रतीक मानतात व आपली निष्ठा तिला वाहतात, असे त्याचे स्पष्टीकरण दिले जाईल. हिंदुस्थानचे एक राष्ट्र घडवायचे असेल तर त्यासाठी राष्ट्रवादाची आधुनिक विचारप्रणाली आपणास फार उपकारक ठरणारी आहे असे शंभर-दीडशे वर्षांपूर्वी त्या भारतीय नवशिक्षितांना वाटले असले तर ती गोष्ट स्वाभाविकच होती.

वेगवेगळ्या राष्ट्रांमध्ये पार पडलेली राष्ट्रीयत्वाच्या जडणघडणीची प्रक्रिया आणि राष्ट्रवादी विचारप्रणाली या दोन वेगळ्या गोष्टी आहेत हे चटकन लक्षात येत नाही. पहिली घडामोड एक ऐतिहासिक, (व म्हणून एकदाच घडणारी) अपूर्व गोष्ट आहे, तर दुसरीचे स्वरूप 'अशा घडामोडींच्या वर आधारून केलेले अमूर्त सिद्धांतन' असे आहे. राष्ट्रवादाविषयी केल्या गेलेल्या विभिन्न सिद्धांतनांमध्ये समान असलेला एक मुद्द असा की राष्ट्रे म्हणजे 'खरे पायाभूत व स्वाभाविक लोकसमूह' होत, आणि राष्ट्रांनुसार जगाची रचना स्वायत्त राष्ट्रसत्तांमध्ये झाली पाहिजे. आपली स्वतंत्र राष्ट्रसत्ता प्रस्थापित करणे हा प्रत्येक राष्ट्राचा (लोकसमूहाचा) जन्मसिद्ध अधिकार आहे, ही गोष्टही अर्थातच गृहीत आहे. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठी चळवळ करावयास निघालेल्या मंडळींना राष्ट्रवादी विचारप्रणालीचे आकर्षण वाटण्याचे हेही एक महत्त्वाचे कारण होते. राजकीय स्वातंत्र्याची मागणी करण्याचा हक्क राष्ट्रवादी विचारप्रणालीनुसार हिंदी लोकांना जन्मसिद्ध होताच.

पण राष्ट्रवाद ही प्रणाली लोकांना जोडणारी ठरेल, संघटन साधणारी ठरेल की त्यांना तोडणारी ठरेल, विघटनकारी ठरेल ही गोष्ट, ती प्रणाली कोणत्या परिस्थितीमध्ये कोण कशी लागू करील यावर अवलंबून राहते. हिंदुस्थानात जे घडले त्यावरूनच या म्हणण्याची पुरेशी स्पष्टता होईल.

ब्रिटिशांचे राज्य प्रस्थापित होण्याचा एक परिणाम पुरेसा ध्यानात घेतला गेलेला नाही. ब्रिटिश अंमलामुळे हिंदुस्थानातील विभिन्न जातीजमातींचे स्वतःविषयीचे भान तीव्र झाले. ख्रिश्चनधर्मियांनी (ब्रिटिश शास्त्रे, मिशनरी, इत्यादींनी) येथील धर्मांवर जे हल्ले चढविले, आपल्या वागण्यातून जे वंशश्रेष्ठत्व प्रकट केले, येथील लोकांमध्ये राष्ट्रीय अस्मिता आढळत नाही म्हणून जे अधिक्षेपात्मक उद्गार काढले, एकंदरीत जो तुच्छभाव प्रकट केला त्यातून या प्रक्रियेला चालना मिळाली. आपला धर्म, आचारविचार, संस्कृती, इतिहास-परंपरा, अस्मिता यांबद्दल स्पष्टता करून घेण्याची निकड उत्पन्न झाली. आपली आत्ताची अवस्था ही अधःपतित व भ्रष्ट अवस्था आहे हा पक्का ग्रह ब्रिटिशांच्या टीकाटिप्पणीमुळे मनोमन रुजला होता. त्या त्या जातीजमातींमधील नवशिक्षितांना पडलेले प्रश्न केवळ पुस्तकी नव्हते. त्या प्रश्नांच्या उत्तरांचा शोध हा खऱ्या मूळ शुद्ध धर्माचा, आचारविचारांचा, संस्कृतीचा, इतिहास-परंपरांचा शोध होता. पुष्कळदा, किंबहुना नेहमीच, असा शोध हा तटस्थ ऐतिहासिक मागोवा नसतो; ती एक सक्रिय नवनिर्मितीची प्रक्रिया असते. जे मनात असते, आपणांस इष्ट, आदर्श, उज्ज्वल, उदात्त वाटत असते तेच प्राचीन काळी अस्तित्वात असल्याचा शोध लागतो. या शोधामागे एक तातडीचे, तीव्र असे उद्दिष्टही व्यवहाराच्या पातळीवर होते. अध:पतित व भ्रष्ट अवस्थेमधून आपापल्या जातीजमातींना, समाजांना उन्नत व परिष्कृत अवस्थेप्रत सुधारण्याचे उद्दिष्ट त्यांच्या डोळ्यासमोर होते. या शोधाचा व त्यावर आधारित हाती घेतलेल्या सुधारणांच्या कार्यक्रमांचा अनिवार्य परिणाम असा झाला की, जातीजमातींच्या, धर्माच्या, आचारविचारांच्या, संस्कृतींच्या, इतिहास-परंपरांच्या कडा रेखीव, कंगोरेदार बनल्या. परस्परांपासूनचे पृथकपण ठसविणारी, त्याला महत्त्व देणारी ही प्रक्रिया होती. नव्या अस्मिता अधिक आग्रही पण होत्या.

ही प्रक्रिया राष्ट्रवादी विचारप्रणालीच्या प्रभावाखाली आली वा तिला राष्ट्रवादी विचारप्रणालीची जोड मिळाली की जातजमातीय अस्मितांच्या परिपोषाला स्वतंत्र, फुटीर राष्ट्रीय आकांक्षा जागविणारे वळण मिळते. हिंदू, मुस्लिम व शीख या तिन्ही समाजांच्या बाबतीत ही पुढची सांगड स्वातंत्र्यपूर्व काळात घातली गेली. आंबेडकरांच्या नेतृत्वाखालील दलित चळवळीची त्या दिशेने अर्धीमुर्धी वाटचाल झाली होती. नाग लोकांनी हे वळण स्वातंत्र्य मिळाल्यानंतर घेतले.

मुस्लीम लीगचे राजकारण देशाचे तुकडे करणारे ठरले. ब्रिटिशांनी प्रस्थापित केलेल्या भौगोलिक चतुःसीमा या एका राष्ट्राच्या

स्वाभाविक व उचित सीमा आहेत ही गोष्ट गृहीत धरून आपण विचार करतो म्हणून, किंवा आपणांस येथील सर्व जातीजमातींचे मिळून एकराष्ट्र निर्माण करायचे असते म्हणून आपण मुस्लिम लीगच्या राजकारणास 'फुटीर' म्हणू शकतो. पण 'येथे खरे तर आमचा केवळ एकछत्री अंमल आहे; भारत हे एक राष्ट्र नाही' हे ब्रिटिशांचे प्रतिपादन स्वीकारले तर मुस्लिम लीगची चळवळ, राजकारण व पाकिस्तानची निर्मिती ही, राष्ट्रवादी विचारप्रणालीच्या सैद्धांतिक मांडणीच्या दृष्टीने राष्ट्रनिर्मितीची एक नमुनेदार ऐतिहासिक घडामोड ठरते.

'खालिस्तान'च्या आकांक्षेचीही हीच गोष्ट आहे. किंबहुना ज्यांना आपण 'फुटीर राष्ट्रवादी' चळवळी म्हणतो व ज्या वैध व योग्य नाहीत असा निवाडा करतो त्या सर्वच चळवळींबद्दलही असेच म्हणता येईल. त्यांच्या परीने त्या सर्व राष्ट्रवादी प्रणाली आणि चळवळी आहेत; आपण "भारत" या राष्ट्राच्या एका विवक्षित संकल्पनेच्या कसोटीवर त्यांना जोखतो म्हणूनच केवळ त्या 'फुटीर' व ‘घातक’ ठरतात; आपल्या परीने राष्ट्रवादी असूनही एकराष्ट्रीयत्वाच्या निर्मितीला बाधक ठरतात.

- 3 -

हिंदुराष्ट्राचे ध्येय पुढे ठेवणाऱ्या सावरकरप्रणीत हिंदुत्ववादी विचारप्रणालीचे व चळवळीचे मूल्यांकन याच दृष्टिकोनामधून केले तर कोणता निष्कर्ष निघतो?

हिंदुत्ववाद ही एक राष्ट्रवादी विचारप्रणाली आहे व हिंदुराष्ट्राच्या निर्मितीची चळवळ ही राष्ट्रवादी चळवळ आहे याविषयी दुमत होण्याचे काहीच कारण नाही. पण भारतीय एकराष्ट्रीयत्वाच्या जडणघडणीच्या, चिरंतनतेच्या दृष्टीने मुस्लिम लीगच्या 'पाकिस्तान'वादी किंवा शिखांच्या 'खालिस्तान'वादी चळवळींप्रमाणे तिचेही स्वरूप फुटीरपणाला उत्तेजक आणि घातक आहे की काय याचा विचार करणे भविष्याच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे.

हिंदुत्ववादी विचारप्रणाली एक गोष्ट गृहीत धरते हे ध्यानात घेणे व तीवर जोर देणे आवश्यक आहे. स्वातंत्र्यपूर्व काळापासून हिंदुत्ववादी लोक 'अखंड भारता'विषयी अत्यंत उत्कट भक्तिभावाने व आग्रहाने बोलत आले आहेत. या अखंड भारताच्या भौगोलिक सीमा त्यांनी सामान्यतः कोणत्या मानल्या? ब्रिटिश अंमलाखालील हिंदुस्थानच्या चतुःसीमाच त्यांनी स्वीकारलेल्या होत्या. (काहींच्या कल्पनेतील भारत हा आणखी बृहत्तर होता.) एक-राष्ट्राच्या चतुःसीमांच्या संदर्भात म्हणायचे तर ज्या काँग्रेसच्या भूमिकेचा व राजकारणाचा प्रतिवाद हिंदुराष्ट्रवादी चळवळीने केला त्या काँग्रेसने स्वीकारलेल्या चतुःसीमाच या चळवळीनेही स्वीकारलेल्या होत्या.

'हे राष्ट्र हिंदूंचे' ही स्पष्ट भूमिका होती. 'हिंदू कोण?' याची व्याख्या सावरकरांनी केली, तसेच हिंदुत्वाचा आशयही त्यांनी स्पष्ट केला. हिंदुस्थानच्या परिसीमांच्या मधील धर्म, संस्कृती, अस्मिता, रीतिरिवाज, इतिहास-परंपरा, थोर पुरुष, इत्यादींच्यापैकी 'हिंदू' गोष्टी कोणत्या आणि 'अहिंदू' गोष्टी कोणत्या याची स्पष्टताही आपल्या भाषणलेखनात त्यांनी वेळोवेळी केली. 'अहिंदू गोष्टी वेगळ्या काढणे' हा हिंदुत्वाचा नकारात्मक आशय म्हणता येईल. 'हिंदुत्वाचा अभिमान म्हणजे कशाकशाचा अभिमान व आग्रह' हा होकारात्मक आशय असे म्हणू. या साऱ्याच्या तपशिलात न जाताही प्रथमतः हे तर स्पष्टपणे म्हणता येईलच की हिंदुस्थानातील मुसलमान व ख्रिश्चन हे त्या काळी (व आजच्याही काळी) प्रचलित असलेल्या अर्थाने मुसलमान व ख्रिश्चन राहून ‘हिंदू’ म्हणून ओळखले जाण्यास पात्र कधीच ठरू शकणार नाहीत अशीच त्यांची सारी मांडणी आहे. किंबहुना, 'परके' ठरवून त्यांना वगळण्यासाठी, त्यांचा प्रतिवाद करण्यासाठी, त्यांच्या संसर्गाने व प्रभुत्वाने शीलभ्रष्ट झालेला हिंदुधर्म, समाज व संस्कृती यांना त्यांच्या प्रभुत्वापासून व संसर्गापासून मुक्त करण्यासाठीच विशिष्ट आशयाची ती मांडणी केलेली आहे. म्हणूनच, त्या लोकांना हिंदू राष्ट्रात राहायचे असल्यास कठोर शर्तीचे बंधन त्यांच्यावर घातलेले होते. 'अहिंदू' ठरविणाऱ्या सर्व गोष्टींचा त्यांनी त्याग केला पाहिजे ही त्यांतली मुख्य शर्त होती.

ही शर्त किती मानहानिकारक व अशक्य होती याची कल्पना एका उदाहरणाच्या साहाय्याने येऊ शकते. आज अमेरिकेत स्थायिक झालेली, अमेरिकन नागरिकत्व स्वीकारलेली अनेकानेक हिंदू कुटुंबे आहेत; बराच मोठा हिंदू समाज तेथे आज आहे.

सावरकरी पद्धतीने 'अमेरिकनत्वा'ची मांडणी केली आणि 'या मंडळींनी हिंदूपण सोडले तरच त्यांना अमेरिकेत सन्मानाने नागरिक म्हणून राहता येईल' अशी शर्त घातली तर तेथील हिंदूंना (व आपणांस) काय वाटेल? अमेरिकन नागरिकत्व पत्करलेल्या हिंदूंनी अमेरिकन राष्ट्रसचेशी राजकीय एकनिष्ठ बाबतीत राहण्याची अपेक्षा ठेवणे रास्त होईल; अमेरिकेतील जीवनाशी त्यांनी समरस व्हावे असेही म्हणणे ठीक होईल; पण हिंदू धर्माची व संस्कृतीची पवित्र स्थळे अमेरिकेबाहेर आहेत म्हणून त्यांनी हिंदू धर्म त्यागावा, तसेच भारताविषयी त्यांनी विशेष आस्था व प्रेम बाळगू नये, असे म्हणणे गैर आहे, अनावश्यक आहे, असे आपण म्हणणार नाही काय? भारतातील मुस्लिम समाजाची गोष्ट याहून कितीतरी गुंतागुंतीची आहे. त्यांची संख्या येथे अगणित पटींनी मोठी आहे एवढेच नाही, तर गेली हजार-बाराशे वर्षे त्यांनी येथीलच एक घटक-समाज म्हणून इतिहास घडविला आहे. अशा परिस्थितीत वरीलसारखी शर्त घालण्याचा व्यवहारातला अर्थ स्वातंत्र्यपूर्व काळीही एकच होऊ शकत होता : 'हे राष्ट्र आम्हा हिंदूंचे आहे, तुम्हा मुसलमानांचे व ख्रिश्चनांचे नाही.'

*ब्रिटिशांनी एकराष्ट्रीयत्वाच्या संदर्भातली कोणतीही एक भूमिका स्वीकारली नाही; त्यांनी देशातील दोन सर्वांत प्रबळ संघटनांना देश वाटून दिला. वाटपाचे तत्त्व कोणते होते? मुस्लिम बहुसंख्या असलेले भूभाग त्यांनी वेगळे केले. थोडा विचार केला तर असे लक्षात येईल की, एका अर्थी जुन्या काळातल्याप्रमाणे मुस्लिमलीगी व काँग्रेसी अशी दोन वारसदार राज्ये त्यांनी निर्माण केली. राष्ट्रवादी प्रणालीवर आधारलेली राष्ट्रीय अस्मिता हा या राज्यांचा आधार नव्हता. पाकिस्तान व भारत या दोन्ही वारसदार राज्यसत्तांच्या पुढे आपल्या 'एकराष्ट्रीयत्वाची बैठक कोणती असावी' हे ठरविण्याची जबाबदारी शिल्लकच होती. राज्यघटना तयार करून औपचारिकपणे एकराष्ट्रीयत्वाचे आधार भारताने स्पष्ट केले. हिंदुत्ववाद हा भारताच्या एकराष्ट्रीयत्वाचा आधार पूर्वी नव्हता व आजही नाही ही स्पष्ट गोष्ट आहे. तात्पर्य असे की, 'हिंदुत्वा'च्या सावरकरी व्याख्येत न बसणाऱ्या, पण भारताच्या सीमांमध्ये राहणाऱ्या सर्व जातीजमातींच्या व धर्मांच्या लोकांचे हे राष्ट्र आहे.*

हिंदुस्थानच्या भौगोलिक चतुःसीमा या राष्ट्राच्या सीमा म्हणून स्वीकारल्यावर, त्या सीमांमध्ये शेकडो वर्षांपासून राहणारे लोक जिच्यात वगळले जातात अशी राष्ट्रीयत्वाची व्याख्या करणारी प्रणाली व चळवळ हीदेखील देश फोडणारीच गोष्ट म्हणायला हवी. मुसलमानांनी 'पाकिस्तान'च्या निर्मितीने देशाचे भौगोलिक तुकडे केले असे आपण म्हणू; तसेच हिंदुत्ववादी जर राष्ट्रनिर्मितीच्या त्यांच्या प्रयत्नांमध्ये यशस्वी झाले तर देशातील लोकांचे तुकडे पडतील, व ती गोष्ट तेवढीच फुटीर व घातक ठरेल, असेही आपल्याला म्हणावे लागेल.

'मुसलमान समाजाने स्वतःसाठी पाकिस्तान संपादन करून वेगळे राष्ट्र निर्माण केल्यावर या (म्हणजे भारत) राष्ट्रावर आता त्यांचा कोणताही हक्क पोचत नाही, भारत हे आता हिंदूंचे राष्ट्र उरले' असा युक्तिवाद केला जातो. तो प्रथमदर्शनी बिनतोड वाटला तरी सर्वस्वी भ्रामक आहे. मुसलमान हा एक स्वतंत्र राष्ट्रीय समाज आहे व आम्हांला वेगळे राष्ट्र मिळावे' अशी मुस्लिम लीगची मागणी होती, तर 'या देशातील सर्व जातीजमातींचे मिळून हे राष्ट्र आहे' हीच कॉंग्रेसची अखेरपर्यंत भूमिका होती. काँग्रेस वा लीग यांच्यापैकी कोणत्याच संघटनेला आपल्या सामर्थ्यावर राष्ट्रनिर्मितीच्या प्रयत्नात यश आले नाही. त्याआधीच ब्रिटिशांनी सत्तेचे हस्तांतर केले. ब्रिटिशांनी एकराष्ट्रीयत्वाच्या संदर्भातली कोणतीही एक भूमिका स्वीकारली नाही; त्यांनी देशातील दोन सर्वांत प्रबळ संघटनांना देश वाटून दिला. वाटपाचे तत्त्व कोणते होते? मुस्लिम बहुसंख्य असलेले भूभाग त्यांनी वेगळे केले. थोडा विचार केला तर असे लक्षात येईल की, एका अर्थी जुन्या काळातल्याप्रमाणे मुस्लिमलीगी व काँग्रेसी अशी दोन वारसदार राज्ये त्यांनी निर्माण केली. राष्ट्रवादी प्रणालीवर आधारलेली राष्ट्रीय अस्मिता हा या राज्यांचा आधार नव्हता. पाकिस्तान व भारत या दोन्ही वारसदार राज्यसत्तांच्या पुढे 'आपल्या एकराष्ट्रीयत्वाची बैठक कोणती असावी' हे ठरविण्याची जबाबदारी शिल्लकच होती. राज्यघटना तयार करून औपचारिकपणे एकराष्ट्रीयत्वाचे आधार भारताने स्पष्ट केले. हिंदुत्ववाद हा भारताच्या एकराष्ट्रीयत्वाचा आधार नव्हता व आजही नाही ही स्पष्ट गोष्ट आहे. तात्पर्य असे की, 'हिंदुत्वा'च्या सावरकरी व्याख्येत न बसणाऱ्या, पण भारताच्या सीमांमध्ये राहणाऱ्या सर्व जातीजमातींच्या व धर्माच्या लोकांचे हे राष्ट्र आहे. तेव्हा, हिंदुत्ववादी विचारप्रणाली व हिंदुराष्ट्रवादी चळवळ ही स्वातंत्र्यपूर्वकाळात होती तितकीच आजही फुटीर व घातक आहे.

हिंदुराष्ट्राची संकल्पना व हिंदुत्ववादी विचारप्रणाली अन्यधर्मियांच्या संदर्भातच तेवढी फुटीर व घातक ठरणारी आहे असे नाही; खुद्द हिंदुधर्मीयांच्या संदर्भातही ती तशी आहे.

एक छोटा वाटणारा पण महत्त्वाचा भेद येथे ध्यानात घेतला पाहिजे. या देशात जनगणनेमध्ये ज्यांची नोंद हिंदू म्हणून होते किंवा ज्यांचा हिंदूंमध्ये ढोबळपणे समावेश केला जातो ते सर्व जण हिंदुत्वाच्या सावरकरी व्याख्येतले हिंदू नाहीत. (भारतातील आदिवासींचा तर समाजशास्त्रीय वा धर्मशास्त्रीयदृष्ट्या हिंदूंमध्ये समावेशही होऊ शकत नाही, कारण ते खऱ्या अर्थाने चातुर्वर्ण्य व जातिव्यवस्था यांच्या बाहेरचे होते व आजही बऱ्याच प्रमाणात तसे आहेत. ही गोष्ट विवाद्य म्हणून सोडली तरी, वरील मुद्दा शिल्लक उरतोच.)

या भेदाचे महत्त्व लक्षात येण्याच्या दृष्टीने आपण एक प्रश्न उपस्थित करू या : स्वातंत्र्यपूर्वकाळी सावरकरांच्या हिंदुत्ववादाला हिंदूंमधीलही इतक्या अल्प लोकांचाच पाठिंबा का मिळाला? अधिक नेमकेपणाने प्रश्न विचारायचा तर, उच्चवर्णियांपैकी ब्राह्मण व काही प्रमाणात वैश्य वर्णात समावेश केल्या जाणाऱ्या जाती यांच्याच मधून हिंदुमहासभेला अनुयायी का मिळाले? व्यापक पाठिंबा का मिळाला नाही? मुस्लिम लीग कालांतराने का होईना, मुसलमान जनसामान्यांमध्ये सर्वत्र लक्षणीय प्रमाणात जाऊन पोचू शकली. हिंदुमहासभा ही तेवढीच जुनी संघटना. मग तिला ही गोष्ट का साधली नाही?

महाराष्ट्रात जे घडले तेच साऱ्या हिंदुस्थानभर कमीअधिक प्रमाणात व थोडेफार मागेपुढे घडलेले दिसते. तेव्हा महाराष्ट्र हा भारतीय वास्तवाचा एक प्रातिनिधिक नमुना मानायला हरकत नाही. या दृष्टीने महाराष्ट्राच्या इतिहासाकडे पाहिले तर काय आढळते?

महात्मा जोतिबा फुले यांनी भटभिक्षुकशाहीवर केलेला हल्ला, ब्राह्मणी धर्म व आर्य संस्कृती यांचे केलेले विश्लेषण आणि काँग्रेस-चळवळीचा केलेला अव्हेर प्रथमतः नमूद करावा लागतो. या दृष्टीने निर्णायक महत्त्वाचा कालखंड काँग्रेसमध्ये टिळकपक्षाचे प्रभुत्व प्रस्थापित झाल्यानंतरचा आहे. पुढे हिंदुत्ववादी विचारप्रणालीत समाविष्ट झालेले अनेक घटक टिळकांच्या लेखनात, भूमिकेत समाविष्ट असलेले आढळतात. वैदिक आर्य संस्कृती, ब्राह्मण्य व ब्राह्मणी हिंदुधर्म, प्राचीन इतिहास, पेशवाई इत्यादी बाबींसंबंधी विशेष अभिमान टिळकांच्या ठायी आढळतो. सावरकरी अर्थाने टिळक हिंदुत्ववादी नव्हते, पण त्यांची दृष्टी हिंदूंना संघटित करण्याची होती. त्यांच्या हिंदु-अभिमानी भूमिकेमुळे, महाराष्ट्रात ब्राह्मणेतर चळवळीची उभारणी हिरिरीने करण्यास व तिचे नेतृत्व करण्यास कोल्हापूरकर शाहू छत्रपती उद्युक्त झाले. काँग्रेसपक्ष १९३० पावेतो टिळकपक्षियांच्या हाती होता. या काळात कॉंग्रेसच्या बाहेर व तिच्या विरुद्ध ब्राह्मणेतर चळवळ फोफावत राहिली. टिळकपक्षीय ब्राह्मणी नेतृत्व बाहेर पडल्यावर १९३० नंतर ब्राह्मणेतर चळवळीतला एक प्रवाह काँग्रेसमध्ये आला व अखेरपर्यंत कॉंग्रेसमध्ये राहिला.

येथील हिंदू समाजात ब्राह्मण व तत्सम उच्चवर्णीय आणि इतर जाती-जमाती यांच्यात, धर्म एक असूनही, सांस्कृतिक, आर्थिक, सामाजिक व राजकीय हितसंबंधांवरून एक मोठी दरी होती, व ती जवळजवळ अनुल्लंघनीय होती. 'धर्म एकच होता' असेही एका मर्यादित अर्थानेच म्हणता येत होते, ही गोष्ट 'वेदोक्त प्रकरणा'ने फार समर्पकपणे दाखवून दिली. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या त्रैवर्णिकांमध्ये व शूद्र, अतिशूद्र व त्याही पलिकडील इतर यांच्यामध्ये धार्मिक क्षेत्रातही अनुल्लंघनीय दरीच होती. टिळकांच्या हिंदू भूमिकेने मराठा बहुजन समाजदेखील कॉंग्रेसकडे आकृष्ट होऊ शकला नाही, मग इतरांचे तर सोडाच.

हिंदूंना एकत्र व संघटित करण्याच्या दृष्टीने आवश्यक म्हणून सावरकरांनी 'जात्युच्छेदक निबंध' लिहिले; रत्नागिरी जिल्ह्यामध्ये अस्पृश्योद्धाराचे कार्यही केले. असे असूनही हिंदुमहासभेकडे महाराष्ट्रातील ब्राह्मणेतर जातीजमातींना ते आकृष्ट करू शकले नाहीत. काँग्रेसचे राजकारण तसेच महात्मा गांधींचे व्यक्तित्व व नेतृत्व या दोन्हींविषयी स्वातंत्र्यवीर सावरकर व डॉ. बाबासाहेब आंबेडकर या दोघांना तुच्छताच वाटत होती. सावरकरांची जात्युच्छेदक भूमिका आंबेडकरांना जवळची वाटायला हवी होती; पण या दोन राजकारण्यांचीही युती होऊ शकली नाही. सावरकरांची जात्युच्छेदक भूमिका व्यवहारात उदार अंतःकरणाने शूद्रातिशूद्र पतितांना 'पावन' करून 'बंधू' म्हणून संबोधण्याची, एकत्र जेवण करण्याची होती; पण ब्राह्मण्य व ब्राह्मणी वर्चस्व

मोडून काढणारी नव्हती. या संदर्भात आंबेडकरांनी सावरकरांना छेडले; पण सावरकर त्यांचे समाधान करू शकले नाहीत.

'ब्रिटिशांना घालवून तुम्हांला येथे ब्राह्मणशाही (किंवा उच्चवर्णीय त्रैवर्णिकांचे राज्य) प्रस्थापित करावयाची आहे; तुम्ही ज्या वैदिक धर्माविषयी, आर्य संस्कृतीविषयी, प्राचीन उज्ज्वल इतिहासासंबंधी अभिमानाने बोलता तो आमचा धर्म नाही, ती आमची संस्कृती नाही, तो आमचा इतिहास नाही; तुमच्या विश्वात शूद्रातिशूद्रांना स्थान कोठे आहे,' हा महात्मा फुल्यांचा सवाल होता. फुल्यांना तर रानड्यांची उदार सुधारकी हिंदुभूमिकाही स्वीकृत झाली नाही. टिळक व पुढे सावरकर यांच्या मांडण्या तर येथील बहुजनसमाजाला शत्रुपक्षाच्याच मांडण्या वाटल्या.

याची एक व्यावहारिक बाजूही होती. टिळक पक्षात व पुढे हिंदुमहासभेत जागजागी कोण मंडळी होती? बव्हंशी ब्राह्मणच होते. ब्राह्मणेतरांचा आर्थिक व राजकीय अभ्युदय साधण्याच्या मार्गात ज्यांचा अडसर व विरोध सर्वात मोठा आहे, ज्यांच्या हातून सत्ता व मत्ता काढून घ्यायची आहे तीच सर्व मंडळी ब्राह्मणेतर जातीजमातींना तेथे दिसत होती. हिंदुत्ववादी भूमिकेच्या प्रतिपादनाने या सामाजिक वास्तवात काही फरक पडेल असे वाटत नव्हते**.** कारण विशेष अधिकार व उपभोग यांवर आपला जन्मसिद्ध व वर्णसिद्ध अधिकार असावा अशाच प्रकारचा त्यांचा व्यवहार उच्चवर्णियेतरांच्या अनुभवाला येत होता.

प्रचलित हिंदुत्ववादी विचारप्रणाली ही चातुर्वर्ण्याधिष्ठित जातिव्यवस्थेमधील उच्चवर्णीय त्रैवर्णिकांची राष्ट्रवादी प्रणाली आहे. अवैदिक व अब्राह्मणी प्रवाहातील हिंदूंची, शूद्र-अतिशूद्र-आदिवासी जातीजमातींची ती प्रणाली होऊ शकत नाही. प्रचलित हिंदुत्ववादी प्रणालीच्या आधारे चालणारी हिंदुराष्ट्रनिर्मितीची चळवळ परंपरेने हिंदू म्हणून ओळखल्या/गणल्या जाणाऱ्या समाजांनाही अलग पाडते व त्या अर्थाने ती स्वतःच एक फुटीर व घातक चळवळ आहे; एकराष्ट्रीयत्वाच्या उभारणीस बाधक ठरणारी आहे.

- ५ -

अलिकडच्या काळात या प्रणालीकडे कोण आकृष्ट होत आहे, तिचा उपयोग कोण कशासाठी करू पाहत आहे, या गोष्टींवरूनही वरील निष्कर्षाला पुष्टी मिळेल.

स्वातंत्र्य मिळाले तेव्हा येथील मराठा बहुजनसमाजाची स्थिती काय होती? काँग्रेसप्रणीत स्वातंत्र्यचळवळीत त्यांच्यापैकी एका प्रवाहाने भाग घेतला होता. त्यांच्या राजकीय आकांक्षा जागृत झाल्या होत्या. पण हा समाज बव्हंशी ग्रामीण व शेतकरी समाज होता. खेडेगावांमध्येही जमिनींची मालकी लक्षणीय प्रमाणात ब्राह्मणवर्गाच्या हाती होती. बहुजनसमाजेतर सावकारांचीही पकड मोठी होती. आर्थिक, राजकीय व सामाजिक दृष्ट्या हा शेतकरी समाज वर्णव्यवस्थेच्या दृष्टीने पाहता शूद्र कोटीतच मोडला असता. शहरांमध्येही अर्थकारण व राज्यकारण यांची सूत्रे ब्राह्मण व तत्सम उच्चवर्णीय यांच्या हातीच होती.

१९६० सालाच्या आसपास ही स्थिती पुष्कळशी पालटलेली होती. हिंदुत्ववादी नव्हे, तर काँग्रेसी आर्थिक विकास व सौम्य समतावादी राजकारण यांच्या मार्गाने हे परिवर्तन घडून आले होते. लोकशाही राज्यपद्धतीच्या अंगीकाराचाही हे परिवर्तन घडवून आणण्यात मोठा वाटा होता. १९६० नंतर खेडेगावापासून ते राज्याच्या राजधानीपर्यंतच्या विविध पातळ्यांवर राज्यसत्ता लक्षणीय प्रमाणात मराठा बहुजनसमाजाच्या हाती आली. काँग्रेस पक्षाच्या प्रांतिक व जिल्हा कमिट्याही त्यांच्या हाती आल्या. सहकारी क्षेत्रातील अर्थकारणातही सत्ता यांचीच होती. सहकारी प्रक्रिया उद्योगांच्या (विशेषतः साखर-उद्योगाच्या) द्वारे कारखानदारी क्षेत्रातही शक्तिसंचय यापुढच्या काळात होत गेला. पांढरपेशे व्यवसाय, सरकारी नोकऱ्याचाकऱ्या, व्यापारउदीम यांच्यातही यांचा मोठ्या प्रमाणावर प्रवेश झाला. शेतीच्या क्षेत्रात 'बागाईतदार वर्ग ' अस्तित्वात आला. हिंदू वर्णव्यवस्थेच्या परिभाषेत या स्थित्यंतराचे वर्णन करायचे तर ते 'शूद्र ते क्षत्रिय' असे करता येईल.

*एका अंगाने हा मराठा बहुजनसमाज ग्रामीण व शेतकरी वळणाचा राहिला असला, जमिनीची मालकी हा त्याच्या आर्थिक, राजकीय व सामाजिक सत्तेचा मुख्य पाया व भक्कम आधार असला तरी त्याची अस्मिता 'क्षत्रिय' वळणाची झाली आहे. आता*

*या समाजाला चातुर्वर्ण्यव्यवस्थाप्रणीत हिंदुधर्माचा उपयोग आहे. 'क्षत्रिय म्हणून राज्याधिकारावर आपला जन्मसिद्ध व वर्णसिद्ध हक्क आहे,' अशी या वर्गाची धारणा झाली असून आपला हा हक्क सर्वांनी मान्य करावा ही आकांक्षा त्याच्या ठायी उत्पन्न झाली आहे. ग्रामीण समाजाचे मूळचे सरंजामशाही वळण त्याला आता अधिकच मानवणारे झाले आहे, कारण आज ते अधिक निरंकुश बनत आहे. 'क्षत्रिय' हे स्थान, त्यासोबत प्राप्त होणारे विशेष अधिकार व उपभोग यांना प्रामाण्य केवळ चातुर्वर्ण्याधिष्ठित हिंदुधर्मातच आहे. त्यामुळेच आपल्या हिंदूपणाचे भान व हिंदुत्वाचे आकर्षणही या समाजात वाढत आहे.*

या स्थित्यंतराबरोबर मुख्यतः मराठा बहुजनसमाजाच्या आर्थिक, राजकीय व सामाजिक हितसंबंधांमध्ये व आकांक्षांमध्येही अंतर पडले आहे. आजही एका अंगाने हा समाज ग्रामीण व शेतकरी वळणाचा राहिला असला, जमिनीची मालकी हा त्याच्या आर्थिक, राजकीय व सामाजिक सत्तेचा मुख्य पाया व भक्कम आधार असला तरी त्याची अस्मिता 'क्षत्रिय' वळणाची झाली आहे. आता या समाजाला चातुर्वर्ण्यव्यवस्थाप्रणीत हिंदुधर्माचा उपयोग आहे. 'क्षत्रिय म्हणून राज्याधिकारावर आपला जन्मसिद्ध व वर्णसिद्ध हक्क आहे,' अशी या वर्गाची धारणा झाली असून आपला हा हक्क सर्वांनी मान्य करावा ही आकांक्षा त्याच्या ठायी उत्पन्न झाली आहे. ग्रामीण समाजाचे मूळचे सरंजामशाही वळण त्याला आता अधिकच मानवणारे झाले आहे, कारण आज ते अधिक निरंकुश बनत आहे. 'क्षत्रिय' हे स्थान, त्यासोबत प्राप्त होणारे विशेष अधिकार व उपभोग यांना प्रामाण्य केवळ चातुर्वर्ण्याधिष्ठित हिंदुधर्मातच आहे. त्यामुळेच आपल्या हिंदूपणाचे भान व हिंदुत्वाचे आकर्षणही या समाजात वाढत आहे.

एखाद्या वर्गाचे आर्थिक व राजकीय बळ वाढल्याने समाजातला त्याचा दर्जा बदलतो हे पूर्वापार ऐतिहासिक वास्तव आहे. हिंदुस्थानात राज्य करून गेलेली अनेकानेक घराणी मुळात शूद्र मानली जाणारी होती. राज्य हाती घेण्यास व उपभोगण्यास त्यांचे शूद्रपण आड आले नाही, पण बदललेला दर्जा घराण्यात वंशपरंपरागत चालत राहण्यासाठी समाजमान्यता मिळवायची असेल तर चार वर्णांची चौकट करून आपल्या घराण्याचा समावेश योग्य क्षत्रिय कुलात/जातीत करून घेण्याची गरज पडे. छत्रपती शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेकाचा इतिहास आठवावा. या सर्व घटपटासाठी चातुर्वर्ण्याधिष्ठित हिंदुधर्माची बैठक व पुरोहितवर्ग यांचा आश्रय घेणे शिवाजीमहाराजांनाही भाग पडले. वर्णसिद्ध वंशपरंपरागत अधिकार एखी प्रस्थापित कसा होणार व समाजात त्याला वैधता कशी प्राप्त होणार? स्वातंत्र्योत्तर काळात 'शूद्र ते क्षत्रिय' हे स्थित्यंतर पावलेल्या मराठा बहुजनसमाजाला हिंदुत्ववादी प्रणालीचा पुरस्कार करणे लाभदायक आहे. महात्मा जोतिबा फुल्यांचे नाव आज राज्यकर्तावर्ग वेळीअवेळी घेत असला तरी, चातुवर्ण्याधिष्ठित जातिव्यवस्था व तिला प्रामाण्य देणारा पुरोहितवर्ग यांचे उच्चाटन करू मागणारा फुल्यांचा क्रांतिकारक वारसा चालविण्याची इच्छा या वर्गाला दिसत नाही. 'क्षात्रजगद्गुरू'चे पद निर्माण करणाऱ्या राजर्षी शाहू-छत्रपतींचा वारसाच त्याला चालवायचा आहे.

हिंदुत्ववादी प्रणाली आपलीशी करीत असलेला मराठा बहुजनसमाजातील मोठा प्रवाह एका बाजूने मुस्लिमविरोधी पवित्रे घेत आहे तर दुसरीकडे दलितांविरुद्ध आपली सत्ता, विशेषतः ग्रामीण भागात, वापरीत आहे, हा काही अपघात किंवा योगायोग नाही. प्रचलित हिंदुत्ववाद हे त्रैवर्णिकांच्या हितसंबंधी अर्थ-राज-समाजकारणाचे सैद्धांतिक अधिष्ठान आहे.

भारतामध्ये हिंदू समाजात ढोबळपणे समाविष्ट केल्या जाणाऱ्या शूद्र -अतिशूद्र-आदिवासी जातीजमातींच्या दृष्टीने विचार केला तरी भविष्यात हिंदुत्ववादी प्रणालीचे परिणाम फुटीर, घातक व विघटनकारीच होतील याची स्पष्टता आता व्हावी.

- ६ -

ब्रिटिशांनी जो सर्व भूभाग एका प्रशासनाखाली आणला, ज्या प्रशासनाला 'गव्हर्नमेंट ऑफ इंडिया' हे नाव दिले, त्याच्या ज्या चतुःसीमा प्रस्थापित केल्या त्या एका राष्ट्राच्या चतुःसीमा म्हणून स्वीकारणे क्रमप्राप्त होते. अशी स्वीकृती अगदीच तर्कदुष्ट, लहरी व अवास्तव नव्हती हेपण लक्षात घेतले पाहिजे. कारण यातील बऱ्याच मोठ्या भूभागाला उद्देशून 'इंडिया' हा शब्द बऱ्याच प्राचीन काळापासून प्रचलित होता. सिंधू नदीशी 'हिंदू' या शब्दाचा संबंध आहे, तसा तो 'इंडिया' या शब्दाचाही आहे. एकीकडे एका राष्ट्राच्या चतुःसीमा म्हणून त्या सीमांचा स्वीकार व दुसरीकडे, त्याच वेळी, राष्ट्रवादी प्रणालीची कसोटी लावून या "चतुःसीमांमध्ये

एकाहून अधिक 'राष्ट्रीय लोकसमूहां'चे वास्तव्य आहे” असे विधान अशा विसंगत भूमिकेनिशी राष्ट्रउभारणीच्या व स्वातंत्र्याच्या चळवळीचा आरंभ करणे गैरच ठरले असते. पण "हिंदुस्थान हे एक-राष्ट्र आहे, या राष्ट्राच्या अमुक अमूक चतुःसीमा आहेत” असे म्हटले की त्या चतुःसीमांमध्ये राहणाऱ्या सर्वच जातीजमातींना बरोबर घेऊन एक-राष्ट्र निर्माण करण्याची जबाबदारीही स्वीकारावी लागते. ती न स्वीकारण्यात तर्कदुष्टता व अविवेक झाला असता. एकराष्ट्रीयत्वाच्या संबंधात काँग्रेसच्या संस्थापकांनी स्वीकारलेली भूमिका सर्वथैव योग्य होती. आजही तीच आपली भूमिका असली पाहिजे, किंवा असे म्हणू की, तीच एकमेव भूमिका असू शकते.

काँग्रेसचे संस्थापक सारे इंग्रजी विद्येत पारंगत होते. लिबरल विचारसरणीचे संस्कार त्यांच्यावर खोल झालेले होते. पण ते व्यक्तिवादी नव्हते. येथील जातजमातनिष्ठ जीवनात ते मुरलेले होते. जातीजमाती हे येथील प्राथमिक वास्तव असल्याची जाण त्यांच्या ठायी होती. या वास्तवाचा स्वीकार म्हणजे, 'लोक धार्मिक आहेत, जातजमातनिष्ठ आहेत,' याचा स्वीकार आणि त्याचवेळी 'धर्म वा जमात ही राष्ट्रीयत्वाची बैठक होऊ शकत नाही' याचे भान. धर्मश्रद्धा, आचारविचार, रीतिरिवाज, सणउत्सव इत्यादींचे परिष्करण करण्याच्या, म्हणजेच आपापल्या जमातीची धार्मिक सामाजिक सुधारणा घडवून आणण्याच्या कामात पुढाकार घेणारी ही मंडळी होती. या सुधारक चळवळींचा परिणाम जातीजमातींची पृथगात्म अस्मिता रेखीव व तीव्र होण्यात होत होता ही गोष्ट वर येऊन गेली आहे. जातजमातीय वैशिष्ट्यपूर्ण आगळेपण व अस्मिता यांचा परिपोष एकराष्ट्रीयत्वाच्या जडणघडणीत अडसर आहे हा त्यांचा अनुभव नव्हता. धार्मिक-सामाजिक सुधारणेच्या कार्यामुळे ज्यांमधून आंधळा कडवेपणा, दुराग्रह, परद्वेष निर्माण होतो अशा कालबाह्य समजुती, रीतिरिवाज, पूर्वग्रह यांचा निरास होत जाईल अशी त्यांची धारणा होती.

काँग्रेसच्या व्यासपीठावर सर्वजण आपापल्या जातीजमातीचे प्रतिनिधी या नात्याने एकत्र आलेले होते. काही संस्था या जातीय-जमातीय नव्हत्या. उदाहरणार्थ, पुण्याची सार्वजनिक सभा. या आधुनिक, 'सेक्युलर' संघटना होत्या. अशा संघटनांचे प्रतिनिधी काँग्रेसच्या व्यासपीठावर येत त्याही वेळी, आपण एका जातीचे/जमातीचे प्रतिनिधित्वही करीत आहोत, कारण आपण त्या जाती/जमातीमधून आलेले आहोत, याचे भान विसरत नव्हते.

भारतीय एकराष्ट्रीयत्वासंबंधीची वैशिष्ट्यपूर्ण धारणा या सगळ्यातून प्रकट होते. हिंदुस्थानच्या चतुःसीमांमध्ये राहणाऱ्या सर्वच जातीजमातींचे लोक सारखेच हिंदी/भारतीय आहेत हे गृहीतच धरलेले होते. विशिष्ट धर्म, भाषा, वा राजकीय विचारप्रणाली ही एकराष्ट्रीयत्वाची बैठक नव्हती. जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धती इष्ट असून हिंदुस्थानात तिचा अंगीकार झाला पाहिजे यावर सर्वांचे एकमत होते. या मर्यादेत एकराष्ट्रीयत्वाला लिबरल राजकीय विचारप्रणालीची बैठक होती असे म्हणता येईल. जातीजमातींची धार्मिक-सामाजिक-सांस्कृतिक स्वायत्तता केवळ स्वीकृत केलेली होती असे नाही; वैशिष्ट्यपूर्ण अस्मितेचा व समूहजीवनाचा परिपोष स्वाभाविक व स्वागतार्ह मानलेला होता. देशातील अनेकानेक जनसमूहांच्या आशाआकांक्षांमध्ये मेळ घालून, तोल साधून परस्परांचा व देशाचा उत्कर्ष साधण्याची कल्पना होती. आधुनिक काळास अनुरूप असे, जातीजमातींच्या पलीकडे पोचणारे इतरही हितसंबंध व समूह स्वीकृत करावेत व त्यांनाही योग्य प्रतिनिधित्व द्यावे/मिळावे हेही गृहीत होते. व्यक्ती व राज्यसत्ता यांचा सरळसरळ संबंध प्रस्थापित करणाऱ्या वा तो पायाभूत धरणाऱ्या आधुनिक लोकशाही व राष्ट्रवादी सिद्धान्तनापेक्षा ही भूमिका वेगळी होती. व्यक्ती या समूहांच्या घटक असतात आणि या समूहांच्या संतुलित प्रतिनिधित्वातून एकराष्ट्रीयत्व सिद्ध करायचे आहे ही भूमिका येथे अंगीकारलेली होती.

कोणताही एक धर्म ही कॉंग्रेसप्रणीत एकराष्ट्रीयत्वाची बैठक नव्हती, व या अर्थाने ती 'सेक्युलर' होती. पण 'धर्मश्रद्धेला नाकारल्याखेरीज भारतामध्ये एकराष्ट्रीयत्वाची जडणघडण होऊ शकत नाही' असा दावा तिच्यामध्ये नव्हता. अडाणी व कालबाह्य समजुती, रीतिरिवाज, कर्मकांड यांचा त्याग करून धर्मश्रद्धांचे व व्यवहारांचे परिष्करण व प्रागतिकीकरण करण्याची गरज स्वीकारलेली होती, पण त्याच वेळी धर्मश्रद्धांचा आदर करण्याचीही भूमिका होती. 'धार्मिक जमातींमधील तणाव व कलह धर्माचाच त्याग केल्याशिवाय मिटणार नाहीत' असे क्वचितच कोणी म्हणत असेल. सर्व धर्मांची मूळ शिकवणूक माणुसकीचाच परिपोष करणारी, मानवमात्रावर प्रेम करण्याचे महत्त्व ठसविणारी, सर्वांचे एकत्व प्रतिपादणारी आहे; आणि म्हणून कोणताच

खरा धर्म हा राष्ट्रीय एकात्मतेच्या आड येणारा नाही अशीच दृढ धारणा होती.

*काँग्रेसपासून मुसलमान समाज दूर राहत आहे हे त्या काळच्या काँग्रेस नेत्यांना दिसत होते. काँग्रेसचे सरकारधार्जिणे टीकाकार, ब्रिटिश प्रशासक व वृत्तपत्रकार या गोष्टीवर भरही देत होते. मात्र हिंदुस्थानच्या एकराष्ट्रीयत्वाची यशस्वी जडणघडण मुस्लिम समाजाला बरोबर घेतल्याशिवाय होऊ शकत नाही ही वस्तुस्थितीही त्यांना स्पष्ट होती. युक्तीप्रयुक्तीने ब्रिटिश राज्यकर्त्यांचा व त्यांची साथ करणाऱ्या मुस्लिम पुढाऱ्यांचा डाव हाणून पाडण्याचे प्रयत्न काँग्रेसच्या नेत्यांनी दीर्घकाळपर्यंत केले. हे प्रयत्न अयशस्वी झाले, याचा अटळ परिणाम आपणांस स्वीकारावा लागला.*

येथील मुसलमान व हिंदू यांच्यामध्ये सामंजस्य व ऐक्य यांचा अभाव आहे; मुसलमान व हिंदू समाज यांच्यातली दुही वाढली तर बरेच असे येथील ब्रिटिश राज्यकर्त्यांचे धोरण आहे; या धोरणास काही मुस्लिम पुढारी बळी पडलेले आहेत, याची जाणीव काँग्रेसच्या नेत्यांना नव्हती असे नाही. काँग्रेसच्या अधिवेशनांना मुसलमानांची उपस्थिती कमी आहे, काँग्रेसपासून तो समाज दूर राहत आहे हे त्यांना दिसत होते. काँग्रेसचे सरकारधार्जिणे टीकाकार, ब्रिटिश प्रशासक व वृत्तपत्रकार या गोष्टीवर भरही देत होते. मात्र हिंदुस्थानच्या एकराष्ट्रीयत्वाची यशस्वी जडणघडण मुस्लिम समाजाला बरोबर घेतल्याशिवाय होऊ शकत नाही ही वस्तुस्थितीही त्यांना स्पष्ट होती. युक्तीप्रयुक्तीने ब्रिटिश राज्यकर्त्यांचा व त्यांची साथ करणाऱ्या मुस्लिम पुढाऱ्यांचा डाव हाणून पाडण्याचे प्रयत्न काँग्रेसच्या नेत्यांनी दीर्घकाळपर्यंत केले. हे प्रयत्न अयशस्वी झाले, त्याचा अटळ परिणाम आपणांस स्वीकारावा लागला.

या देशातील विविधधर्मीय, भाषिक, वांशिक-सांस्कृतिक समूहांमधून एक-राष्ट्र घडवायचे तर काँग्रेसच्या आद्य नेत्यांनी अंगीकारलेल्या भूमिकेहून वेगळी भूमिका असू शकत नाही या मुद्द्यास या अपयशाने बाधा येत नाही. भूमिका चुकीची होती म्हणून अपयश आले, असे नाही. कॉंग्रेसचा प्रयत्न फसेल तरच आपण आपले राज्य राखू शकतो याचे स्पष्ट भान असणाऱ्या ब्रिटिश राज्यकर्त्यांचे डावपेच, त्यांनी दाखविलेल्या प्रलोभनांना बळी पडलेले मुस्लिम पुढारी, हिंदू व मुस्लिम (व इतरही) समाजांमध्ये उभ्या राहिलेल्या फुटीर राष्ट्रवादी चळवळी, 'बहुमत-अल्पमत या पद्धतीने - म्हणजे आधुनिक लोकशाहीच्या यांत्रिक स्वरूपाचा अंगीकार केल्याने - या नाजुक व गुंतागुंतीच्या आव्हनाला यशस्वीपणे सामोरे जाणे अशक्य आहे' याची १९२० नंतर पुढे आलेल्या नेहरूप्रभृती तरुण काँग्रेसनेत्यांना नसलेली पुरती समज, आणि १९२० नंतरच्या जनसामान्याधिष्ठित राजकारणाच्या युगात काँग्रेस-अंतर्गतही वाढीस लागलेला हिंदू पुनरुज्जीवनवाद या विविध कारणांनी हिंदुस्थानचे एक-राष्ट्र घडविण्यात काँग्रेसला यश आले नाही.

*हिंदू, मुसलमान, ख्रिश्चन, शीख व इतर समाजांमधील जातीयवादी शक्तींच्या निर्णायक पराभवासाठी पं० नेहरूंची भिस्त नियोजनबद्ध आर्थिक विकास, लोकशाही कल्याणकारी राज्य व लिबरल शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार यांच्यावर होती. या प्रक्रियांमधून प्रागतिक, सेक्यूलर व एकात्म भारतीय समाजाचे स्वप्न साकार होईल अशी त्यांना खात्री होती. पण लोकशाही, आर्थिक-औद्योगिक विकास, शहरीकरण, शिक्षणप्रसार या साऱ्या गोष्टी पचवून भारतातील पारंपरिक जात- जमात-अधिष्ठित समाजव्यवस्थेने नवा जोम व सामर्थ्य प्राप्त करून घेतल्याचेच दृश्य अनुभवास येत आहे. काँग्रेसप्रणीत एकराष्ट्रीयत्वाचा संस्कार व प्रभाव झपाट्याने ओसरलेला आहे. भारतीय राज्यघटना आज राजकारणात उत्कर्ष पावत असलेल्या जात-जमातनिष्ठ शक्तींच्या लेखी पवित्र तर नाहीच, उलट कवडीमोलाचीच आहे. या शक्तींची राष्ट्रनिष्ठा फार शबल आहे. त्या एका राष्ट्रसत्तेखाली नांदतात, पण 'राष्ट्र आहे तर आपण आहोत' याचे त्यांना भान नाही, दूरदृष्टी नाही व जबाबदारीची जाणीवही नाही.*



एकराष्ट्रीयत्व घडविण्याचे काम अपुरेच राहिलेल्या अवस्थेत शेष भारतात काँग्रेसच्या हाती सत्ता आली ही गोष्ट या लेखाच्या आरंभी नमूद केलेली आहे. हे काम अपुरे राहिले आहे याकडे दोन कारणांनी दुर्लक्ष झाले : (१) ब्रिटिशांची परकीय सत्ता आणि मुस्लिम लीगचे पाकिस्तानवादी राजकारण या विघटनकारी शक्ती बाहेर फेकल्यावर 'उरलेल्या समाजात एकराष्ट्रीयत्व निर्माण

झालेले आहेच' असे गृहीत धरले गेले; (२) राष्ट्राशी एकरूप कोण झाले नव्हते, तर मुसलमान; त्यांना पाकिस्तान देऊन टाकल्यावर मागे भारतात राहिलेल्या मुसलमानांना इतःपर फुटीर राजकारण करण्यातले वेडेपण कळून येईल, आणि ते राष्ट्रीय प्रवाहाशी समरस होतील अशीही आशा बाळगली गेली. पण या दोन्हींपेक्षा आणखी एक कारण अधिक प्रभावी ठरले असले पाहिजे. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर दोन-सव्वादोन वर्षांच्या काळात राज्यघटना तयार करण्याचे काम निर्विघ्नपणे व सामंजस्याने पार पडले. अनुसूचित जातीजमातींचा एक अपवाद वगळता, जातजमातीय-धार्मिक समूहांना वेगळे प्रतिनिधित्व देण्यात आले नव्हते. त्याची कोणी मागणीही केली नव्हती. समाज एकात्म आहे हे गृहीतच धरलेले होते; राजकीयदृष्ट्या कोणाचेच विभक्तपण वा सामूहिक अस्तित्व मान्य केलेले नव्हते. एकराष्ट्रीयत्वाच्या निर्मितीची ही खूणगाठच मानली गेली.

पण हा निष्कर्ष बरोबर नव्हता.

भारतात अल्पसंख्याक समाजांना मुस्लिम-लीगी पद्धतीचे फुटीर राष्ट्रवादी राजकारण करणे, तेही यशस्वीपणे करणे अवघड, जवळपास अशक्य झाले होते. कारण पूर्वीप्रमाणे अशा राजकारणास फूस देणारी, उचलून धरणारी, आपल्या उद्दिष्टांसाठी अशा राजकारणाचा वापर करणारी परकी राज्यसत्ता निघून गेली होती. पण ज्या प्रकारे देशाची फाळणी झाली, भीषण हत्याकांड घडले त्यामुळे मुस्लिमद्वेषाची, मुसलमानांचा प्रतिवाद करण्याची हिंदुत्ववादी भावना हिंदू समाजात बऱ्याच मोठ्या प्रमाणावर पसरलेली होती. या भावनेची लागण काँग्रेसच्या सर्वसाधारण अनुयायांमध्येच झाली होती असे नाही तर, काँग्रेसच्या लहानमोठ्या पुढाऱ्यांमध्येही झालेली होती. महात्मा गांधींची हत्या हे या भावनेच्या विषवृक्षाला आलेले फळ होते. उफाळून आलेल्या द्वेषभावनेचा निचरा या हत्येच्या घटनेने त्या क्षणी तरी झाला. या पुढच्या काळात भारतात हिंदूंच्या संख्याधिक्याचा स्वाभाविक परिणाम म्हणून राज्यांमध्ये व केंद्रामध्ये त्यांच्या हातीच नेहमी सत्ता राहील आणि या पार्श्वभूमीवर हिंदू समाजात हिंदुत्ववादी जातीय शक्तींचा जोर वाढेल व एकराष्ट्रीयत्वाला बाधक अशा फुटीर प्रवृत्ती निर्माण होतील असा धोका स्वातंत्र्योत्तर काळात निर्माण झाला आहे, याचे वास्तववादी भान पंडित नेहरूंना कायम होते.

त्यांच्या हयातीत हिंदुत्ववादी शक्तिंचे प्रभुत्व समाजजीवनात, राजकारणात वा प्रशासनात त्यांनी प्रस्थापित होऊ दिले नाही. काँग्रेस संघटनेमध्येही त्यांनी सनातनी वळणाच्या हिंदू गटाचा पाडाव केला व संघटना आपल्या ताब्यात घेतली.

हिंदू, मुसलमान, ख्रिश्चन, शीख व इतर समाजांमधील जातीयवादी शक्तींच्या निर्णायक पराभवासाठी पं. नेहरूंची भिस्त नियोजनबद्ध आर्थिक विकास, लोकशाही कल्याणकारी राज्य व लिबरल शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार यांच्यावर होती. या प्रक्रियांमधून प्रागतिक, सेक्यूलर व एकात्म भारतीय समाजाचे स्वप्न साकार होईल अशी त्यांना खात्री होती. पण लोकशाही, आर्थिक-औद्योगिक विकास, शहरीकरण, शिक्षणप्रसार या साऱ्या गोष्टी पचवून भारतातील पारंपरिक जातजमात-अधिष्ठित समाजव्यवस्थेने नवा जोम व सामर्थ्य प्राप्त करून घेतल्याचेच दृश्य अनुभवास येत आहे. जात, जमात, धर्म यांच्या आशयात, अंतरंगात व संघटनेत पुष्कळ परिवर्तन घडून आले आहे. 'आर्थिक व राजकीय सत्तास्पर्धेचे साधन' म्हणून या सामाजिक संस्थांचा प्रभावी वापर करण्याच्या दृष्टीने हे पुनर्संघटन एका बाजूने घडून आले आहे. दैनंदिन ऐहिक जीवनव्यवहारांचे आधुनिकीकरण/सेक्युलरायझेशन झपाट्याने होत असतानाच दुसरीकडे धर्माच्या राजकारणीकरणाची प्रक्रियाही घडत चालली आहे. कॉंग्रेसप्रणीत एकराष्ट्रीयत्वाचा संस्कार व प्रभाव झपाट्याने ओसरलेला आहे. भारतीय राज्यघटना आज राजकारणात उत्कर्ष पावत असलेल्या जात-जमातनिष्ठ शक्तींच्या लेखी पवित्र तर नाहीच, उलट कवडीमोलाचीच आहे. या शक्तींची राष्ट्रनिष्ठा फार शबल आहे. त्या एका राष्ट्रसत्तेखाली नांदतात, पण 'राष्ट्र आहे तर आपण आहोत' याचे त्यांना भान नाही, दूरदृष्टी नाही व जबाबदारीची जाणीवही नाही.

पं. नेहरूंनी आपल्या हयातीत थोपवून धरलेले संकट नव्याच स्वरूपात अधिक ज्वलंत बनून उभे ठाकले आहे. त्यातच महाराष्ट्राचे उदाहरण घेऊन वर जे विवेचन केले आहे त्यात स्पष्ट केल्याप्रमाणे, मध्यम किसान 'शूद्र' जातींच्या हाती राज्यांमध्ये सत्ता आल्यानंतर आपल्या 'क्षत्रिय'त्वाचे हिंदुत्ववादी भान जे त्यांच्या ठायी वाढत आहे त्याची भयावह भर पडत आहे. परिपुष्ट बनलेल्या जातीजमातींचे अदूरदर्शी, स्वार्थोंध, सत्तापिपासू राजकारण फोफावल्याने निर्माण झालेली फुटीर परिस्थिती मुळातच देशाला

विघटनाकडे घेऊन जात असताना, त्यात जर नव' क्षत्रियांच्या जातीयतावादी राजकारणाची भर पडली तर कोणते संकट कोसळेल त्याची चुणूक भिवंडीच्या दंगलींच्या वेळी दिसलेली आहे.

भारताच्या एकराष्ट्रीयत्वाला दिल्या जाणाऱ्या आव्हानांना तोंड देण्यासाठी आज लष्कराचा सातत्याने वापर होत आहे. पण या एकराष्ट्रीयत्वाला भारतीय लष्कर आणखी किती काळ टिकवून धरू शकेल?

- ८ -

‘भारतात ढोबळमानाने हिंदू म्हणून ओळखला, गणला जाणारा समाज संख्येने मोठा आहे व मोठा राहणार आहे; लोकशाही राजकीय व्यवस्थेमध्ये, सामान्यतः, या समाजाचे भारतावर आर्थिक व राजकीय प्रभुत्व राहणार आहे; राज्यसत्ताही याच समाजाच्या हाती प्राधान्येकरून राहणार आहे' या वास्तवापासून आपण पळ काढू शकत नाही. आज हा समाज जातीजमातींमध्ये विभागला गेलेला आहे; आपापल्या जातीजमातीची अस्मिता त्याला प्रिय आहे; त्या अस्मितेच्या पलीकडे त्याला 'हिंदू' म्हणून स्वतःची ओळख आहे. तो हिंदू आहे, पण 'हिंदुत्ववादी' नाही; सश्रद्ध आहे, धार्मिक आचारविचार, कर्मकांड, श्रद्धा, सण-उत्सव यांत गुंतलेला आहे, पण स्वभावतः त्याची धर्मश्रद्धा व वागणूक कडवी नाही. 'हिंदू'पणाची व्याख्या सुस्पष्टरीत्या करणे कठीण आहे; नेहमीच कठीण गेले आहे. पण इतके निश्चित की या देशाचे वातावरण, या देशाचे वळण हिंदू राहणार आहे; भारतीय जनजीवनाचा व संस्कृतीचा रंग हिंदू असणार आहे. या वास्तवाचाही मोकळेपणाने स्वीकार केला पाहिजे.

याचा अर्थ 'हे राष्ट्र हिंदूंचे, हिंदुराष्ट्र' असा मात्र होत नाही. या देशातील 'मुख्य प्रवाह' हा दीर्घकाळपर्यंत सैलसर अर्थाने हिंदू राहील इतके या समाजाचे संख्याधिक्य आहे व प्राचीन काळापासूनचे सातत्यही आहे एवढे साधे तथ्य आपण स्वीकारतो आहोत. ते स्वीकारणे नितांत आवश्यक आहे. पण म्हणूनच या हिंदूसमाजाचे चारित्र्य व व्यक्तित्व पारंपरिक सनातनी ब्राह्मणी वळणाचे, हिंदुत्ववादी नसणे अत्यंत आवश्यक आहे.

'चातुर्वर्ण्य, जातिव्यवस्था, त्याअंतर्गत असलेली उच्चनीचता व स्पृश्यास्पृश्यता यांचे प्रामाण्य व्यवहारात पूर्णपणे नाकारल्यावर हिंदूपण म्हणून काही उरते का?’ असा प्रश्न येथे उपस्थित होऊ शकेल. 'हिंदू' या संकल्पनेची व्याख्या आपण कशी करतो त्यावर या प्रश्नाचे उत्तर अवलंबून राहते.

इतिहास आपणांस असे सांगतो की सनातनी ब्राह्मणी/वैदिक हिंदुधर्म (त्यातील अनेकानेक विधी व कर्मकांड, घटपट, चातुर्वर्ण्य व जातिव्यवस्था) कमीअधिक प्रमाणात ज्यांनी अव्हेरला, त्याविरुद्ध ज्यांनी बंडखोरी केली, ज्यांनी त्या त्या काळातील सनातन्यांशी संघर्ष केला, व जे जनसामान्यांशी समरस झाले अशा हिंदूंची अखंड परंपरा साधुसंतांच्या रूपाने आपल्या देशात चालत आलेली आहे. महात्मा फुले, न्यायमूर्ती रानडे, महात्मा गांधी, रामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, संत गाडगेबाबा ही अलिकडच्या काळातील या प्रकारच्या हिंदूंची काही उदाहरणे सांगता येतील. आध्यात्मिक जीवनदृष्टी, उदार सहिष्णुता, जनसामान्यांच्या जीवनाशी व सुखदुःखांशी समरसता, जीवनातील साधेपणा, सर्वसमावेशक वृत्ती असे या हिंदूपणाचे काही विशेष सांगता येतील. हे हिंदुपण 'हिंदुत्ववादा'च्या दुसऱ्या टोकाला आढळणारे आहे! जन्मसिद्ध व वर्णसिद्ध अधिकार, विशेष उपभोग व दर्जा यांच्या ठाम विरोधी असे हे हिंदूपण असेल ही त्याची एक कसोटी मानता येईल. त्यात अन्यधर्मियांचा, निधर्मियांचा, आदिम धर्मियांचा दुस्वास नसेल, उलट त्यांच्याविषयी स्वागतशील आदरभाव असेल ही निर्णायक कसोटी मानता येईल.

हे हिंदूपण सर्वांपर्यंत पोचणारे, सर्वांना जोडून व सामावून घेणारे आहे. धर्म, जात, जमात, भाषा, वंश, संस्कृती कोणताच मुद्दा त्याला इतरांबरोबर एकराष्ट्रीयत्व प्रस्थापित करण्याच्या आड येत नाही. इतकेच नाही तर बंधुत्वाचे व सहानुभावाचे वर्तुळ मोठे करण्यास सदैव उत्सुक राहणारे हे हिंदूपण आहे.

भविष्यात हिंदू समाजाचे चारित्र्य व व्यक्तिमव या आशयाचे घडणार की नाही यावर या देशातील इतर जातीजमातींचे चारित्र्य व

व्यक्तिमत्त्व यांची घडण निर्णायक रीत्या अवलंबून राहील. कारण आता आर्थिक सामर्थ्य, राजकीय सत्ता येथील हिंदूसमाजाच्या हाती आहे. हिंदू समाज म्हणतो तेव्हा अर्थातच प्राधान्याने आर्थिक, सामाजिक व राजकीय दृष्ट्या वरिष्ठ व बलिष्ठ असणाऱ्या त्रैवर्णिकांसह (नव'क्षत्रियां'सह) हिंदू समाज आपणांस अभिप्रेत आहे.

शेष भारतात एकराष्ट्रीयत्व निर्माण होणार की नाही ही गोष्ट इथला त्रैवर्णिक हिंदू समाज कोणत्या अर्थाने हिंदूपण जपतो यावर अशा रीतीने अवलंबून आहे.

या दृष्टिकोणातून पाहिल्यास ब्रिटिशांच्या आगमनानंतर हिंदुत्ववादी राष्ट्रवादाची मांडणी करण्याच्या ओघात राजकीय हेतूंच्या पूर्ततेच्या अंगाने 'हिंदू'ची जी व्याख्या करण्यात आली तिची राष्ट्रविघातकता मनात ठसते. हिंदुराष्ट्रवाद्यांनी वैदिक संस्कृतीचा व परंपरेचा बडेजाव वाढवीत सनातनी पारंपरिक हिंदुधर्माचे व धर्मपीठांच्या महंतांचे प्रस्थच वाढविले आहे. मुस्लिम व ख्रिश्चन कडवेपणास तोडीस तोड व प्रत्युत्तर म्हणून हिंदुत्वाचा परिपोष करायचा, तर हिंदुत्वाची संकुचित व आक्रमक व्याख्या करणेच भाग पडते. चातुर्वर्ण्य, जातिव्यवस्था, यज्ञयाग व कर्मकांड यांना पूर्ण फाटा देऊन अशी व्याख्या करता येत नाही. टिळक व सावरकर यांची (कळत-नकळत) ही कोंडी झाली. खरे दोघेही वृत्तीने सुधारक, पण मुसलमानांचा प्रतिवाद करण्याच्या भरात सनातनी व कडव्या हिंदुत्वाचा पुरस्कार करून गेले. हिंदुमहासभा ही जात्युच्छेदक कार्य करणारी संघटना कधीच ठरली नाही. आजही राष्ट्रीय स्वयंसेवक संघासारख्या संघटनेची अशीच कोंडी झालेली आहे.

भविष्याला सर्जकतेने सामोरे जाण्यासाठी प्रत्येक समाजाला आपल्या पूर्वेतिहासातील व परंपरेतील काही भाग (अनादर न करता) टाकून द्यावा लागतो. जो इतिहास घडला त्याचे ऋण स्वीकारून ही निवड करावी लागते. या देशातील हिंदू लोक आपला पूर्वेतिहास व परंपरा यांपैकी कोणत्या गोष्टी विकसित करायचे ठरवितात आणि कोणत्या गोष्टींना सोडचिठ्ठी देतात यावर इतर समूह कसे वागतील, राष्ट्रबांधणीत ते मनःपूर्वकतेने सामील होतील की नाही हे अवलंबून राहणार आहे. 'मुख्य प्रवाह' असलेल्या समाजाला जबाबदारीही अधिक उचलावी लागते आणि पुढे व्हावे लागते. 'इतरांकडे पाहून आम्ही वागू' असे हिंदू समाज म्हणेल तर तो या देशावर आपला ठसा कसाकाय उमटविणार?

> स्वातंत्र्यपूर्वकाळात ब्रिटिश सत्तेच्या प्रोत्साहनाने या देशात अनेक जमातींनी फुटीर राजकारण केले आणि आजही तो संस्कार, ते वळण आणि ती परंपरा अस्तंगत झालेली नाही. वैशिष्ट्यपूर्ण जातजमातीय पृथगात्मता व जातजमातीय अस्मिता यांना एकराष्ट्रीयत्वाच्या आड न येईल असा आकार देणे, त्या दृष्टीने आवश्यक व अनुरूप मुरड त्यांना घालणे वा त्यांमध्ये बदल करणे या गोष्टी शक्य नव्हत्या असे नाही. पृथगात्म अस्मिता व एकराष्ट्रीयत्व यांमधील अविरोध काँग्रेसच्या संस्थापकांनी आपल्या जीवनांत व कार्याद्वारे प्रत्यक्ष प्रकट केल्याचा इतिहास होताच. पण फुटीर राजकारण करणाऱ्यांनी जाणूनबुजून उलटा क्रम आरंभिला. ही गोष्ट केवळ मुसलमानांनी केली असे नाही; हिंदू, शीख, अस्पृश्य, ख्रिश्चन सर्वांनीच केली; धर्म, इतिहास व संस्कृती यांना फुटीर राजकारणाची प्रभावी साधने बनविले.

निवड अगदी स्पष्ट आहे. एका उदाहरणाने ती स्पष्ट होईल. भूतपूर्व सरसंघचालक गोळवलकर गुरुजी यांनी सुचविले होते की अस्पृश्य बांधवांच्या गळ्यात यज्ञोपवीत घालून त्यांना स्पृश्यांमध्ये दाखल करून घ्यावे म्हणजे झाले. पण या मार्गात चातुर्वर्ण्य व जातिव्यवस्था, उच्चनीचभेद व त्रैवर्णिकांचे वर्चस्व या गोष्टी कायमच राहतात. हिंदू धर्म, इतिहास व परंपरा यांच्या विविध प्रवाहांपैकी संकुचित प्रवाह निवडला जातो. यज्ञोपवीत घालणाऱ्यांच्या हाती लगाम राहतो. विश्व हिंदू परिषदेचे आजचे रूप सिद्ध करण्यात गोळवलकर गुरुजींचा मोठा वाटा होता हे अभिमानाने सांगितले जाते याची येथे आठवण व्हावी. क्षत्रिय ब्राह्मण वैश्य यांची सत्ता धर्मश्रद्धेच्या आधारे प्रस्थापित करण्याच्या चळवळीचे ही परिषद हे व्यासपीठ ठरेल अशी लक्षणे दिसतात. याउलट, जयप्रकाश नारायण यांनी बिहारमधील 'संपूर्ण क्रांती आंदोलना'च्या वेळी शेंडी कापण्याचा व जानवे तोडण्याचा कार्यक्रम दिला होता. सगळ्यांनी शूद्रअतिशूद्र बनण्याचा हा कार्यक्रम त्याच वेळी हिंदू धर्म, इतिहास व परंपरा यांमधील एक प्रवाह ठामपणे

नाकारतो. जयप्रकाश नारायण यांची भूमिका महात्मा जोतिबा फुल्यांच्या भूमिकेशी जवळीक साधणारी आहे; संतांची परंपरा अर्थपूर्णरीत्या पुढे चालविणारी आहे.

स्वातंत्र्यपूर्व काळात ब्रिटिश सत्तेच्या प्रोत्साहनाने या देशात अनेक जमातींनी फुटीर राजकारण केले आणि आजही तो संस्कार, ते वळण आणि ती परंपरा अस्तंगत झालेली नाही. वैशिष्ट्यपूर्ण जातजमातीय पृथगात्मता व जातजमातीय अस्मिता यांना एकराष्ट्रीयत्वाच्या आड न येईल असा आकार देणे, त्या दृष्टीने आवश्यक व अनुरूप मुरड त्यांना घालणे वा त्यांमध्ये बदल करणे या गोष्टी शक्य नव्हत्या असे नाही. पृथगात्म अस्मिता व एकराष्ट्रीयत्व यांमधील अविरोध काँग्रेसच्या संस्थापकांनी आपल्या जीवनांत व कार्याद्वारे प्रत्यक्ष प्रकट केल्याचा इतिहास होताच. पण फुटीर राजकारण करणाऱ्यांनी जाणूनबुजून उलटा क्रम आरंभिला. ही गोष्ट केवळ मुसलमानांनी केली असे नाही; हिंदू, शीख, अस्पृश्य, ख्रिश्चन सर्वांनीच केली; धर्म, इतिहास व संस्कृती यांना फुटीर राजकारणाची प्रभावी साधने बनविले.

आपापला धर्म, इतिहास, संस्कृती यांवर अधिष्टित वैशिष्ट्यपूर्ण आगळेपणाचा व अस्मितेचा परिपोष करताना भारतातील सर्वच जातीजमातींना एकराष्ट्रीयत्वाच्या मर्यादा पाळण्याचे पथ्य काटेकोरपणे सांभाळावे लागेल, त्या दृष्टीने जरूर तेथे मुरड घालावी लागेल, सुधारणा करावी लागेल, यात काही शंका नाही. पण हे पथ्य पाळण्याचा आग्रह इतरांबाबत धरण्याचा नैतिक अधिकार 'मुख्य प्रवाह' असलेल्या हिंदू समाजाला तेव्हाच असेल, जेव्हा तो स्वतः आपल्या आचरणाने व उक्तीने या बाबतीत आदर्श घालून देईल.

- ९ -

एकराष्ट्रीयत्वाची जडणघडण प्रत्येक देशात वेगवेगळ्या मार्गांनी साधली गेली, आणि तिची बैठक प्रत्येक देशाची स्वतःची आगळी अशीच आहे असे आपणांस दिसते. सर्व देशांमध्ये एकाच नियमावलीप्रमाणे खेळला जाणारा हा एखादा खेळ नव्हे. सजीव व्यक्तींच्या अनेकविध घटकसमूहांमधून एक बृहत् सामूहिक व्यक्तित्व व रचना साकार करण्याची ही प्रक्रिया आहे हे ध्यानात घेतले तर याबाबतीत एक देश दुसऱ्या कोणत्याच देशासारखा नसतो याचे आपणांस नवल वाटणार नाही.

एखादी वस्तू तयार करण्याची उत्पादनतंत्रे विविध असतात; त्यांपैकी आपण आपल्या सोयीने एखादे निवडतो. एक राष्ट्र घडविणे ही प्रक्रिया वस्तू उत्पादन करण्यासारखी नसते; ती अजोड अशा कलाकृतीच्या निर्मितीसारखी असते. पुन्हा असे की, हवे ते साहित्य वाटेल तेथून आणता येत नाही. माणसांचे मानस, त्यांचा इतिहास, त्यांच्या परंपरा, त्यांचे बनणारे लहान-मोठे समूह जसे असतील, (आणि हरघडीस जसे बदलत जात असतील) तसे हाताशी घेऊन ही 'कलाकृती' सिद्ध करावी लागते.

थोडक्यात, राष्ट्रनिर्मिती ही प्रक्रिया एतद्देशीयच असू शकते.

कलाकाराच्या मनात कलाकृतीचा आराखडा असतो तशी राष्ट्र निर्माण करणाऱ्यांच्या मनात राष्ट्राची एक संकल्पना व आराखडा असतो वा असावा लागतो. 'हिंदुराष्ट्र' हा असाच एक आराखडा आहे. काँग्रेसने संकल्पिलेले बहुरंगी राष्ट्र हा आणखी एक. असा कोणताही आराखडा मनात बाळगण्यास आपणांस पूर्ण मोकळीक आहे. मानवी स्वतंत्रतेचा तो एक भाग आहे. पण एकेका आराखड्यानुसार राष्ट्रनिर्मिती करण्यासाठी मोजावी लागणारी किंमत, पाळावयाची पथ्ये, त्याची व्यवहार्यता, इत्यादींसंबंधी आपण आधीच काही गोष्टी सांगू शकतो. हिटलरला ज्या आराखड्यानुसार जर्मनीत 'आर्य जर्मन राष्ट्र' निर्माण करायचे होते त्याची किंमत अगणित ज्यू व जर्मन लोकांचे शिरकाण, हडेलहप्पी हुकूमशाही, सर्वसंहारक महायुद्ध या प्रकारची मोजावी लागली. हिंदू राष्ट्राच्या धर्तीची पाकिस्तान निर्मितीची संकल्पना मुस्लिम लीगने ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या अप्रत्यक्ष-प्रत्यक्ष हातभाराने प्रत्यक्षात आणली, त्याची आपणास अमानुष भीषण किंमत द्यावी लागली. हिंदुराष्ट्र हा या देशाचा राष्ट्रनिर्मितीचा आराखडा म्हणून स्वीकारल्यास याच प्रकारची - माणुसकीचा मुडदा पडण्याची - किंमत द्यावी लागेल, व म्हणून तो आपण ठामपणे नाकारला पाहिजे, असा निष्कर्ष येथवरच्या विवेचनातून नोंदविला आहे.

'आजच्या भारताच्या भौगोलिक चतुःसीमांमधील सर्व जातीजमातींना घेऊनच एका राष्ट्राची निर्मिती केली पाहिजे, आणि तिचे अधिष्ठान सरंजामशाही वा चातुर्वर्ण्य व जातिव्यवस्था हे असता कामा नये' ही काँग्रेसच्या संस्थापकांची भूमिका योग्य होती. ती आजही योग्यच आहे.

- १० -

१९४७ नंतर परकी राज्यसत्तेचा अडसर नव्हता; तरीही राष्ट्रनिर्मितीच्या खंडप्राय आकार, त्यातल्या वेगवेगळ्या भागांचे भिन्न भाषिक, वांशिक, प्रक्रियेचे पाऊल फार पुढे का पडले नाही?

भारतीय समाजाची प्रकृती, भारतीय माणसांचे मानस, भारताची इतिहास-परंपरा नाकारून राष्ट्रनिर्मितीचा प्रयत्न केला गेला ही आपली मोठी चूक झाली असे म्हणावे लागते. महात्मा गांधींचा (जवळपास एकमेव असा) ठळक अपवाद सोडला तर, स्वातंत्र्याचे राजकारण करणाऱ्या इतर सर्व पुढाऱ्यांचा मनोमन निर्णय असा दिसतो की, एतद्देशीय वारसा आधुनिक राष्ट्रनिर्मितीच्या आडच येणारा आहे. जातीजमातींचे अस्तित्व स्वीकारावे लागतेच म्हणून, पण तोही तसा अडसरच. काँग्रेसच्या आद्य संस्थापकांची भूमिका जातीजमातींच्या संदर्भात अधिक स्वीकारशील होती हे खरे; पण 'राष्ट्राच्या जडणघडणीचे एतद्देशीय वेगळेपण काय व कसे राहील' याविषयी त्यानीही विशेष विचार केलेला आढळत नाही. त्यांच्याही डोळ्यांसमोर पाश्चात्य पुस्तकी नमुना होता. पाश्चात्य वास्तव ते फारसे जाणत नव्हते.

भारताची राज्यघटना ही एक नमुनेदार लिबरल राज्यघटना आहे, जिच्यात आर्थिक समतेचे तत्त्वही काही प्रमाणात अंतर्भूत आहे. पण ती एक तर पुस्तकी आहे, आणि भारतीय वास्तवाशी पूर्णपणे फारकत घेणारी आहे. तीही जाणूनबुजून. 'राज्यघटना बनविण्याची प्रक्रिया हीच राष्ट्रनिर्मितीची प्रक्रिया होय' अशी समजूत घटनाकारांनी करून घेतली असावी. आज मागे वळून पाहता असे वाटते की घटना तयार करणाऱ्या विद्वान मंडळींनी त्यांना घातलेला 'गृहपाठ' परिश्रमपूर्वक सोडविला इतकेच !

एतद्देशीय वास्तवाची दखल न घेतल्याने, त्या वास्तवाचा योग्य तो आदर न केल्याने समाजजीवन थांबून राहिले आहे असे नाही. विलक्षण गतिमान व जोमदार वाटचाल समाजाने गेल्या तीसचाळीस वर्षांमध्ये केली आहे. पण राष्ट्रनिर्मितीची प्रक्रिया एतद्देशीयच असावी लागते व असते ही जाण नसल्याकारणाने घटनाकारांना अनिष्ट वाटलेल्या वळणानेच नेमका समाज जात राहिलेला दिसतो. चातुर्वर्ण्य व जातिव्यवस्था व सरंजामशाही वळणच जास्त परिपुष्ट झाल्याचे आढळते. या प्रवृत्तींनी सहजपणे राज्यघटना व तिच्या मुळाशी असलेली मूल्ये गुंडाळून ठेवली आहेत.

कलाकृती निर्माण करणाऱ्या कलावंताला तो वापरीत असलेल्या साधना-माध्यमांचे गुणधर्म, सामर्थ्य व मर्यादा यांची उत्तम जाण असावी लागते, व त्याचा पुरेसा आदरही करावा लागतो. त्यांचा कौशल्याने, सुजाणपणे वापर करूनच तो कलाकृती सिद्ध करतो. राष्ट्राच्या निर्मितीच्या बाबतीत तर ही गोष्ट अधिकच खरी आहे. कारण येथे साधने-माध्यमे निर्जीव द्रव्यांच्या स्वरूपातील नाहीत. जिवंत लोकसमूहांना (त्यांच्या मनात व वागण्यात रुजलेल्या श्रद्धा, समजुती, मूल्ये, रीतिरिवाज, परंपरा यांसह) स्वीकारून कुशलतेने व डोळसपणे तरतम करीत त्यांना राष्ट्रीय अस्मितेशी एकरूप करायचे असते.

- ११ -

'राष्ट्रनिर्मितीची एतद्देशीय प्रक्रिया' म्हणजे नेमके काय याची फोड येथे करणे उचित ठरेल.

हिंदुस्थानचा इतिहास पाहिला तर आढळते की सर्व हिंदुस्थानवर राज्य करणाऱ्या सत्ता या साम्राज्यसत्ता राहिल्या आहेत. हिंदुस्थानचा खंडप्राय आकार, त्यातल्या वेगवेगळ्या भागांचे भिन्न भाषिक, वांशिक, सांस्कृतिक इतिहास, परंपरा, विभिन्न भौगोलिक-आर्थिक रचना यांमुळे 'वेगवेगळ्या भागांमधली एकसंध राज्ये व त्यांच्या डोक्यावर त्या सर्वांना एकछत्री राजकीय व्यवस्थेत बांधणारी साम्राज्यसत्ता' हा घाट अनिवार्यच होता. आजही अमेरिका, चीन, रशिया यांसारखी खंडप्राय राष्ट्रे पाहिली तर

त्यांच्या रचना मूलतः अशा द्विस्तरीयच दिसतात. अमेरिकेचा अध्यक्ष, रशियाचा व चीनचा पंतप्रधान यांचे स्थान अंशतः सम्राटासारखेच राहिलेले आहे.

हिंदुस्थानच्या इतिहासावरून दुसरीही एक गोष्ट आढळून येते. नोकरशाही यंत्रणेमार्फत सर्व बारीकसारीक गोष्टींवर केंद्रातून नियंत्रण ठेवण्याच्या प्रयत्नात ती यंत्रणा एक तर फार डोईजड व खर्चिक बनते; अकार्यक्षम व भ्रष्ट बनते आणि व्यवहारात तिच्यावर नियंत्रण प्रस्थापित करणे अधिकाधिक अवघड बनत जाते. नियंत्रण जितके जास्त कडक करायला जावे तितकी व्यवस्था बेभरवशाची व अस्थिर बनते. अखेरीस ती स्वतःच्याच भाराने कोसळते, व अनेक स्वतंत्र राज्यांना जन्म देते. (औरंगजेबाजी कारकीर्द हे याचे एक उत्तम उदाहरण.) याउलट, प्रेरक व उत्तुंग व्यक्तिमत्त्वाचे नेतृत्व जर केंद्रस्थानी असेल, आणि लहानमोठ्या राज्यांवर सुभ्यांवर विश्वासू व एकनिष्ठ सहकारी असतील तर, लवचिकतेमुळे व स्वायत्ततेमुळेच, सर्वकष नियंत्रण प्रस्थापित न करताच स्थिर व एकात्म व्यवस्था अस्तित्वात येते व टिकते. ती अधिक कार्यक्षम तर असतेच, पण ती अधिक सर्जक व पुरुषार्थी/ पराक्रमी पण ठरते. (अशोक, अकबर, शिवाजी यांची उदाहरणे येथे आठवावीत.) पण या व्यवस्थेतही एक पथ्य सांभाळावे लागेच. लवचिकतेची व स्वायत्ततेचीही एक लक्ष्मणरेषा असते. तिचे उल्लंघन करू पाहणाऱ्याची उचलबांगडी केल्याशिवाय साया व्यवस्थेची एकात्मता टिकवून धरणे शक्य नसते.

भारतीय समाजव्यवस्थेचे एक वैशिष्ट्यही ध्यानात घेणे आवश्यक आहे. वांशिक-सांस्कृतिकदृष्ट्या पृथगात्म अस्मिता, इतिहास, परंपरा, जीवनमार्ग असणारे लहानमोठे समूह (टोळ्या वा जमाती) आपापले पृथगात्म वैशिष्ट्यपूर्ण संघटन, आपली अस्मिता, जीवनमार्ग इत्यादी कायम राखून तपशीलवार श्रमविभागणीच्या सूत्रानुसार उभारणी केलेल्या बृहत् व व्यामिश्र अशा समाजव्यवस्थेत तुकडेजोडीच्या पद्धतीने सांधले गेलेले असणे हे भारतीय समाजाचे रचनासूत्र आहे. या रचनेचे वैशिष्ट्य असे की या समूहांचे (जातीजमातींचे) समूहजीवनाच्या अनेक अंगांवर स्वतःचेच नियंत्रण असे. सामान्यतः राज्यसत्ता ज्या बाबतींत अधिकार, निर्णय व सत्ता आपल्या हाती राखते त्या बाबींच्या संदर्भातही जातजमात पंचायत सामान्यतः सार्वभौम असे. त्या त्या राज्याच्या सर्वाधिकारी राजाचे काम अशा बव्हंशी स्वयंनियंत्रित अनेक जातीजमातींच्या जीवनव्यवहारांचे अन्योन्याश्रयी आर्थिक जीवनाच्या क्षेत्रात एकसूत्रीकरण साधण्याचे, तसेच जातपंचायतींमध्येच वाद उपस्थित झाल्यास निवाडा करण्याचे असे. दुसऱ्या अंगाने, खेडेगाव हा जो पायाभूत घटक त्याच्या आर्थिक-राजकीय-सामाजिक जीवनाची सूत्रे पंचायतीकडे असत आणि एका सर्वसाधारण व्यापक व सैलसर चौकटीत गावाच्या कारभाराच्या बाबतीत गावपंचायत ही सार्वभौम असे. (१) जातीजमाती आणि (२) गाव यांच्या मिळून या दुहेरी सार्वभौमत्वाचा आदर करीत, त्यांच्या स्वायत्ततेला वाव ठेवीत, त्यांचा विश्वास संपादून राज्य करणारा राजा हा उत्तम ठरत असे. राज्याचे एकंदर धोरण, राज्याची उद्दिष्टे यांची स्पष्टता व त्या बाबतीतली ठाम भूमिका, राजाच्या मागचे सैनिकी सत्तेचे पाठबळ, त्याचे कर्तृत्ववान व करारी नेतृत्व यांचा चोख प्रत्यय व्यवहारात समाजातील या सार्वभौम उपव्यवस्थांना येणे अर्थात आवश्यक असे.

> *देशामध्ये सत्तेचे एकच एक मध्यवर्ती केंद्र असण्यात भारतीय एकात्मता नव्हती. राज्ये अनेक अलत. त्यांचा संकोच विस्तार सतत चालत असे. त्यांतली सगळी राज्ये एतद्देशीयांची असत असेही नाही; भारतीय इतिहास हा अखंड परचक्रांचा इतिहास आहे. (पहिले मोठे परचक्र आर्यांचे !) अशा स्थितीतही टिकलेल्या भारतीय एकात्मतेचे रहस्य तिच्या ग्रामव्यवस्थेत व समाजव्यवस्थेत आहे असे लक्षात येईल. वैशिष्ट्यपूर्ण, पृथगात्म व स्वायत्त अशा जनसमूहांमधून, त्यांचे धर्म, रीतीरिवाज, अस्मिता, जीवनमार्ग, व्यवसाय यांची स्वायत्तता व वैशिष्ट्ये कायम ठेवून, सामूहिक नियंत्रणही बरेचसे त्या त्या जनसमूहाच्या हाती स्थानिक पातळीवर सोडून देऊन घडविलेली एक अत्यंत प्रगल्भ अशी ही बृहत् आर्थिक व राजकीय व्यवस्था होती. या व्यवस्थेचा पायाभूत घटक म्हणजे खेडेगाव. त्याचे संघटन पुन्हा प्रजासत्ताकाच्या धर्तीचे. खेड्याची ही स्वायत्तता पाहून ब्रिटिश अधिकारी प्रथम अचंबित झाले आणि नंतर ती स्वायत्तता त्यांनी निग्रहाने मोडून काढली. भारतात कोठेही जा, ग्रामव्यवस्था व समाजव्यवस्था यांचे सारखेपण हा येथील*

*एकात्मतेचा एक मुख्य आधार व आविष्कार होता, व आज पुष्कळशा पडझडीनंतरही तो मोठ्या प्रमाणावर तसाच आहे.*

ही ऐतिहासिक पार्श्वभूमी व परंपरा यांपासून एकराष्ट्रीयत्वाच्या दृष्टीने आपण काही बोध घ्यावयास नको का? अत्यंत गुंतागुंतीच्या व विशाल व्यवस्थेतील राज्यकारणाचा प्रदीर्घ व सखोल अनुभव भारतातील असंख्य व्यक्तींच्या अंगात परंपरा व संस्कार यांच्या द्वारा मुरलेला आहे, ही गोष्ट महत्त्वाची नाही का? दुर्दैवाने आपल्या इतिहासाकडे, परंपरांकडे आपले केवळ दुर्लक्षच झाले असे नाही, तर आपण त्यांना मध्ययुगीन, जुनाट, सरंजामी म्हणून बादही ठरविले.

आजही भारताची जडणघडण वैशिष्ट्यपूर्ण पृथगात्म जातीजमातींनीच झालेली आहे. जरी आर्थिक जीवनाची घडी आज पार बदलली असली, राजकीय व्यवस्था आधुनिक लोकशाहीची असली, गावाचे व जातपंचायतीचे सार्वभौमत्व कायद्याने अमान्य केलेले असले आणि व्यवहारातही त्याला प्रचंड धक्के देण्यात आलेले असले; हे विध्वंसनाचे कार्य गेली दीडशे वर्षे चालले असले तरीही असंख्य प्रकारे जुने घाट नव्या पेहेरावात व नव्या संमिश्रणात जोमाने आर्थिक, सामाजिक व राजकीय जीवनाची पकड घेताना आपण अनुभवीत आहोत. भारताची एकराष्ट्रीयता व एकात्मता एतद्देशीय इतिहास, परंपरा, मानस यांचा आंतरिक विकास व स्थित्यंतरे यांमधून घडणेच अधिक उचित होणार आहे. मग ती इमारत भक्कम पायावर उभारलेली असेल.

"भारतीय एकात्मतेचे रहस्य कशामध्ये साठवलेले होते व आहे**?**" या प्रश्नाचे उत्तर आपण दिले तर हा विषय अधिक स्पष्ट होईल**.** देशामध्ये सत्तेचे एकच एक मध्यवर्ती केंद्र असण्यात भारतीय एकात्मता नव्हती. राज्ये अनेक असत. त्यांचा संकोच-विस्तार सतत चालत असे. त्यांतली सगळी राज्ये एतद्देशीयांची असत असेही नाही; भारतीय इतिहास हा अखंड परचक्रांचा इतिहास आहे. (पहिले मोठे परचक्र आर्यांचे!) अशा स्थितीतही टिकलेल्या भारतीय एकात्मतेचे रहस्य तिच्या ग्रामव्यवस्थेत व समाजव्यवस्थेत आहे असे लक्षात येईल. वैशिष्ट्यपूर्ण, पृथगात्म व स्वायत्त अशा जनसमूहांमधून, त्यांचे धर्म, रीतिरिवाज, अस्मिता, जीवनमार्ग, व्यवसाय यांची स्वायत्तता व वैशिष्ट्ये कायम ठेवून, सामूहिक नियंत्रणही बरेचसे त्या त्या जनसमूहाच्या हाती स्थानिक पातळीवर सोडून देऊन घडविलेली एक अत्यंत प्रगल्भ अशी ही बृहत् आर्थिक व राजकीय व्यवस्था होती. या व्यवस्थेचा पायाभूत घटक म्हणजे खेडेगाव. त्याचे संघटन पुन्हा प्रजासत्ताकाच्या धर्तीचे. खेड्याची ही स्वायत्तता पाहून ब्रिटिश अधिकारी प्रथम अचंबित झाले आणि नंतर ती स्वायत्तता त्यांनी निग्रहाने मोडून काढली. भारतात कोठेही जा, ग्रामव्यवस्था व समाजव्यवस्था यांचे सारखेपण हा येथील एकात्मतेचा एक मुख्य आधार व आविष्कार होता, व आज पुष्कळशा पडझडीनंतरही तो मोठ्या प्रमाणावर तसाच आहे.

एकात्मतेच्या अगदी उलट स्वरूपाचे वाटणारे वैशिष्ट्य - पृथगात्म स्वायत्तता - हेही परदेशीयांना येथे आढळत आले; एकाच वेळी या दोन्ही गोष्टी भारतात वसत होत्या हे ध्यानात घेणे आवश्यक आहे. पण हे पृथगात्म जनसमूह व ही स्वायत गावे एकाकी, सुटीसुटी नव्हती, तर ती इतर जनसमूहांसोबत, कमीअधिक विशाल क्षेत्रात परस्परांशी जोडलेली होती, परस्परांवर अवलंबून होती, आणि नकळतच त्यांनी एकमेकांच्या अनेक गोष्टी आत्मसात केलेल्या होत्या. अगणित वनस्पती, कीटक व प्राणी यांच्या अन्योन्याश्रयी, परस्परानुप्रवेशी संबंधांमधून निसर्गात वैशिष्ट्यपूर्ण एकसंध सजीव सृष्टी आकार घेते आणि त्या त्या क्षेत्रातील सजीव सृष्टीचे एक वैशिष्ट्यपूर्ण पर्यावरण असते. सगळ्या घटक सजीव जातींचा त्या पर्यावरणाच्या निर्मितीमध्ये सहभाग असतो आणि त्या पर्यावरणाचे ते वाटेकरीही असतात. त्यांची वैशिष्ट्यपूर्ण पृथगात्मता, स्वायत्तता कमी होत नाही; ती इतरांशी असलेल्या संबंधांनी मर्यादित होत असते, पण तोलूनही धरली जाते व संरक्षितही केली जाते. ते पर्यावरण घनदाट सदाहरित जंगलाचे असो की वाळवंटाचे असो की नदीकाठच्या सपाट सुपीक भूमीचे असो, त्यात बाहेरून नव्याने येणाऱ्याला त्याच्या एकात्मतेचा प्रकर्षाने प्रत्यय येतो. भारतात येणाऱ्याचे हमखास तसे होत असे. परका जनसमूह येथेच आपले घर करी तेव्हा कालांतराने तो तेथल्या वातावरणात मुरून जाई व मुरण्याच्या प्रक्रियेत त्याचे एक भारतीय रूप सिद्ध होई. मग त्याच्या मूळ स्वकीयांना तो 'आपला' म्हणून ओळखण्यास व स्वीकारण्यास अडचण वाटे. अरबस्तानमधील 'पाक' मुसलमानांना हिंदुस्थानातील मुसलमान पार भ्रष्ट, बाटगे वाटत; ते त्यांना अर्धेअधिक हिंदूच वाटत. पारशी हे अर्ध्याहून अधिक गुजरातीच झालेले होते**.** हीच क्रिया काही इंग्रज

माणसांचीही अगदी अव्वल इंग्रजी काळात झालेली होती. त्यांच्या 'हिंदू' पणामुळे विलायती इंग्रज त्या काळी कमालीचे अस्वस्थ झालेले आढळतात. जनसमूहांची स्वायत्त पृथगात्मता व वांशिक-सांस्कृतिक वैशिष्ट्ये कायम राखणाऱ्या या ग्रामव्यवस्थेची वीण अतिशय घट्ट होती – 'व्यक्तीला येथे स्वातंत्र्यच कोठे आहे' असा प्रश्न अनेकांना पडण्याइतकी.

स्वतःच्या एकात्मतेसाठी आणि आपल्या दैनंदिन व्यवहारांसाठी या समाजव्यवस्थेला व संस्कृतीला केंद्रीय राजकीय सत्तेची विशेष आवश्यकता नव्हती. उलट, या स्थानिक व जातजमातीय व्यवस्थांना स्वतःशी संलग्न ठेवणे केंद्रीय राजसत्तांना (स्वतःचे अस्तित्व टिकवण्यासाठी) आवश्यक होते. सर्वच राज्ये लुटारू असतात, आणि आपल्या ललाटी एक ना एका राजाकडून लुटले जात राहण्याचा भोग कायमचा लिहिलेला आहे, असाच खेड्यांचा व मोठ्या पेठांचाही सामान्य अनुभव राहिला. याच्या बदल्यात परचक्रांपासून व चोर-दरोडेखोरांपासून संरक्षण मिळाले तर त्यांना हे लुटारू राज्यही ठीक वाटे. (प्रजाहितदक्ष राजा लाभला तर परमभाग्य.)

आजही सर्वसामान्य लोकांचा राज्यसत्तेचा व राज्यकर्त्यांचा अनुभव फारसा वेगळा नाही आणि त्यांचे मानसही काही वेगळे नाही या विचार करण्यासारख्या गोष्टी आहेत.

- १२ -

ही विलक्षण एकात्म व स्वायत्त ग्रामव्यवस्था, समाजव्यवस्था आणि संस्कृती उद्ध्वस्त करण्याचे काम ब्रिटिशांनी सुरू केले ही गोष्ट खरी; पण आपण ते तसेच पुढे चालविले आहे हेही तितकेच खरे. सर्वकष सत्तेसाठी आकांक्षी असलेल्या राजेशाह्यांनी आधुनिक राष्ट्रीय राज्यसत्ता आकारास आणल्या, आणि राजेशाह्या नष्ट झाल्यावरही आधुनिक पाश्चात्य एकराष्ट्रीयत्वाची व राष्ट्रवादाची बैठक सर्वंकष केंद्रीय राज्यसत्ता हीच कायम राहिली. याच धर्तीची साम्राज्यशाही ब्रिटिशांनी भारतात प्रस्थापित करण्याचा उपक्रम केला आणि आता आपण तिचे रूपांतर राज्यघटनेच्या आधारे संघराज्यात्मक एकछत्री अंमलामध्ये करीत आहोत. 'अशा अंमलाची सर्वकष केंद्रीयता हीच एकराष्ट्रीयत्वाची एकमेव बैठक असून ती आधुनिक, पुरोगामी, शास्त्रीय व योग्य आहे' अशी (पाश्चात्यांना अनुसरून) आपण आपली धारणा बनविली आहे. एकात्मतेचा व एकराष्ट्रीयत्वाचा हा प्रकार अत्यंत विध्वंसक व विघातक आहे. साम्राज्यवादी युगामधील शोषण-पिळवणूक-दडपणूक आणि दोन महायुद्धे व तिसऱ्याची जय्यत तयारी यांमधून याचा प्रत्यय पुरेसा आलेला आहे.

'आपल्या एकात्मतेची व एकराष्ट्रीयत्वाची बैठक सर्वेकष केंद्रीय राज्यसत्ता हीच असावी, आणि पृथगात्मक व स्वायत्त जनसमूह व ग्रामपंचक्रोशी यांचे अस्तित्व नष्ट व्हावे' असा आपला आग्रह असण्याचे खरोखरी काही कारण आहे काय?

उच्चनीचता, स्पृश्यास्पृश्यता, स्वामी दास या संबंधांवर आधारलेली चातुर्वर्ण्याधिष्ठित जातिव्यवस्था आपणांस तोडायची आहे. व्यवसायबंदी, रोटीबंदी, बेटीबंदी जन्मजात असू नये, कायद्यानेच तिला प्रतिबंध असावा हा आमचा आग्रह आहे. पण वैशिष्ट्यपूर्ण धर्म, संस्कृती, अस्मिता, रीतिरिवाज, परंपरा, जीवनमार्ग असणाऱ्या तसेच लक्षणीय प्रमाणात स्वायत्तव स्वनियंत्रित अशा जनसमूहांना आमचा विरोध असण्याचे काय कारण १ सर्व व्यक्तींचे काही मूलभूत मानवी हक्क आहेत व ते त्यांना उपभोगता यावेत हा आग्रह आपण जरूर राखावा व त्यासाठी अनुरूप व उचित रचना, संस्था घडवाव्यात, निर्बंध घालावेत. नव्या स्वरूपाच्या जनसमूहांची निर्मिती करावी. एकसूत्रीकरणासाठी किमान तेवढे करावे, पण जनजीवनाच्या वैशिष्ट्यपूर्णतेचा, स्वायत्ततेचा, स्वनियंत्रिततेचा आदर करावा, स्वागत करावे.

सरंजामशाही वतनदारी आपणांस मोडायची आहे. क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य या उच्चवर्णीयांची सत्ता वंशपरंपरा राहावयास नको आहे. पूर्वीच्या काळी ज्या प्रकारची सत्ता गावच्या कुळकर्ण्याच्या व पाटलाच्या हाती होती ती आपण काढून घेतली, प्रत्येकाला मताचा अधिकार दिला, निवडणुकांचे तत्त्व/पद्धती अंगिकारली. हे या दृष्टीने ठीक झाले. पण ग्रामव्यवस्थेची स्वायत्तता व स्वनियंत्रितता आपण का जोपासू नये?

'असे केल्याने एक-एक जनसमूह व एक-एक गाव हे बेट बनेल व अंदाधुंदी माजेल, परस्परसंबंध काही उरणार नाहीत, प्रगती होणार नाही, राष्ट्रीय पातळीवर आपण महान कामगिऱ्या पार पाडू शकणार नाही' अशा तऱ्हेची भीती बाळगण्याचे कोणतेच कारण नाही. पंढरीची वारी, कुंभमेळा या बृहत् पातळीवरील मोठ्या गोष्टी नाहीत काय? बृहत् परिमाणात ज्या गोष्टी करणे जरुरीचे वाटेल त्यासाठी लोक वाटा शोधतील, संस्था-यंत्रणा उभ्या करतील, रीतिरिवाज पाडतील. आपल्या अवतीभवती पाहिले तरी पूर्वापार व आजही अशा प्रकारच्या असंख्य घडामोडी आजही लोक व समूह यशस्वीरीत्या हाताळीत असल्याचे दिसेल. बव्हंशी स्वायत्त व स्वनियंत्रित ग्रामव्यवस्था या प्रक्रियेच्या आड पूर्वी आली नाही व पुढे येण्याचे कारण नाही.

तात्पर्य असे की, पूर्वापार परदेशीयांना जाणवलेली भारताची आगळ्या प्रकारची, स्वायत्त घटकांची एकात्म समाजव्यवस्था व संस्कृती ही भारतीय एकराष्ट्रीयत्वाची बैठक असावी हे अधिक योग्य आहे. दीडशे वर्षोच्या आघातानंतर ती अद्याप लोकांच्या मनात व व्यवहारामध्ये जिवंत आहे. एकराष्ट्रीयत्वाच्या या अधिष्ठानावर प्रहार करून त्याला खच्ची करणाऱ्या गोष्टी आपण करत राहतो आणि मग राष्ट्रीय एकात्मतेचे (न सुटणारे) प्रश्न उपस्थित करतो!

आपल्या अडाणीपणाच्या परिसीमा जाणणे ही शहाणे बनण्याची व राहण्याची सुरुवात व गुरुकिल्ली असते असे म्हणतात. पाश्चात्यांच्या प्रभावाखाली आपली बुद्धी आणि इतर इंद्रिये जणू काही स्वतंत्रपणे कामच करीनाशी झाली, इतकी की शतकानुशतकांच्या ऐतिहासिक प्रक्रियेने साध्य झालेली खंडप्राय देशाची वैशिष्ट्यपूर्ण सामाजिक व सांस्कृतिक एकात्मता व तिचे रहस्य आपण नवशिक्षित गावठी साहेबलोक जाणू शकत नाही अशी स्थिती झाली. हिंदुत्ववाद आणि सेक्युलॅरिझम या दोन्ही याच अडाणीपणाच्या दोन परी आहेत. आणखी अशाच परी आपणांस सांगता येतील. आपला अडाणीपणा जर आपण जाणला तर लक्षात येईल की एकराष्ट्रीयत्वासाठी मूळची भक्कम बैठक अस्तित्वात आहेच.

भारतीय एकात्मतेचे रहस्य जाणले तर राष्ट्रबांधणीचे एतद्देशीय सूत्रही हाती येते. प्रशासन व राज्याधिकार हा जास्तीत जास्त खालच्या पातळ्यांवर सोडून देण्याचे पथ्य दरेक वरिष्ठ पातळीवर सांभाळायचे. खालच्या प्रत्येक पातळीचा घटक जितका स्वाश्रयी व स्वनियंत्रित राहू शकत असेल तितकी मोकळीक ठेवायची. वरिष्ठ पातळीवरील घटकाचे काम लवादाचे, मेळ घालण्याचे, एकसूत्रीकरणाचे, नेतृत्व देण्याचे, खालच्या सर्व पातळ्यांवरील घटकांपुढे भविष्याचे एक आवाहक दर्शन ठेवण्याचे. प्रत्येक खालच्या पातळीवरील घटकाला असे वाटले पाहिजे की बृहद् व्यवस्थेचा घटक बनण्याने व राहण्याने आपल्या पुरुषार्थाला, पराक्रमाला, अभ्युदयाला पायबंद बसण्याऐवजी उलट वाटा मोकळ्या होतात, आपली उंची वाढते. छत्रपती शिवाजी महाराजांनी ही गोष्ट साधली हे त्यांच्या थोरवीचे रहस्य. त्याच एकराष्ट्रीयत्वाच्या बळावर मराठी स्वराज्याने औरंगजेबी मोगल साम्राज्याचा यशस्वी मुकाबला केला; सत्तेचे कोणतेही एक केंद्र काबीज केल्याने वा एक व्यक्ती मारल्याने वा कैद केल्याने औरंगजेबास मराठ्यांच्या स्वराज्याचा भंग करता येणेच शक्य नव्हते, इतके मराठी लोकांमध्ये राष्ट्रैक्य मुरलेले होते.

येथे साम्राज्यसत्तेचा वा दुबळ्या केंद्रसत्तेचा पुरस्कार करायचा नाही. समाजसंघटनेच्या प्रत्येक पातळीवर व घटकाला अधिकाधिक स्वायत्तता असावी व त्या घटकाच्या हाती स्वनियंत्रण राहावे; या प्रकारे संघटित झालेली अंशतः भौगोलिक आर्थिक व अंशतः भाषिक तत्त्वावर आधारलेली आटोपशीर स्वायत्त राज्ये असावीत. आणि वरिष्ठ केंद्रीय पातळीवर एकसूत्रीकरण, दिग्दर्शन व नेतृत्व यांचा भागच जास्त व महत्त्वाचा असावा. 'युरोपमध्ये 'सामाजिक बाजारपेठेच्या (कॉमन मार्केट) बाबीपासून आरंभ होऊन याच दिशेने भविष्यात एक रचना उभी राहील असे दिसते. या प्रक्रियेच्या ओघात तेथे स्वतंत्र राष्ट्रे आपल्या सार्वभौमत्वाला मुरड घालीत आहेत. (उलट भारतात आपणांस डोळसपणे घटकांची स्वायत्तता वाढवावयास हवी आहे.) अखिल युरोपच्या पातळीवर केंद्रस्थानी त्यांना एकसूत्रीकरण, दिग्दर्शन व नेतृत्व देणारी व्यवस्था साकार करावी लागत आहे. तीपासून आपल्याला बरेच काही शिकता येईल.

- १३ -

'स्वायत्त व स्वनियंत्रित जातीजमाती व खेडी या पायाभूत घटकांच्या साहाय्याने एकात्म भारताची निर्मिती करण्याचा उपर्युक्त

प्रस्ताव हा चातुर्वर्ण्याधिष्ठित जातिव्यवस्था व मध्ययुगीन सरंजामशाही यांचे पुनरुज्जीवन करण्याचाच प्रस्ताव आहे' असा आक्षेप घेण्यात येईल. परंतु चातुर्वर्ण्याधिष्ठित जातिव्यवस्था व मध्ययुगीन सरंजामशाही यांचे पुनरुज्जीवन प्रस्तुत लेखकालाही नको आहे.

जातिव्यवस्थेत जातीजमाती बंदिस्त असण्याचे दिवस मागे पडले आहेत. स्वातंत्र्योत्तर भारतातील जातजमातनिष्ठ राजकारण व त्या राजकारणाचा जोम या जातिव्यवस्थेच्या बंदिस्त चौकटीत अशक्य असणाऱ्या गोष्टी आहेत. जातिव्यवस्था हा खोडा होता, पण त्या खोड्यातून जातीजमातींची मुक्तता झाली आहे. दलितांवरील अत्याचार हीदेखील या वस्तुस्थितीचीच उफराटी, पण खूणच आहे. पण जात हाच आजही कुटुंब व गोतावळा यांच्या पलीकडे माणसांना आकार व सुरक्षितता देणारा समूह आहे. हा भेद लक्षात ठेवला पाहिजे, कारण त्याचे फार महत्त्व आहे.

जाती व जातिव्यवस्था कशा अस्तित्वात आल्या व त्यांमध्ये कोणती स्थित्यंतरे घडून आली, विशेषतः जातींच्या संख्येत भर कशी पडत गेली व त्यांच्यात श्रमविभागणी वेळोवेळी कशी होत गेली, हे भारतीय समाजशास्त्रातले कूट प्रश्न आहेत. जातिव्यवस्थेची विशिष्ट मांडणी व रीती यांमुळे जाती हे वैशिष्ट्यसंपन्न पृथगात्म वांशिक-सांस्कृतिक समूह दीर्घ कालावधीत विकसित झाले आहेत ही गोष्ट जनजीवन थोडेही जवळून पाहणाऱ्यास स्पष्ट दिसते. जातिव्यवस्थेच्या खोडयात अडकल्यामुळेच केवळ जाती या वेगळ्या समूहांच्या स्वरूपात टिकून राहिल्या होत्या हे खरे नाही. बदलत चाललेल्या परिस्थितीमुळे भविष्यात या समूहांची सरमिसळ होऊन जाईल आणि वेगळ्याच पायावर विविधवर्गीय/व्यावसायिक/जीवनमार्गी समूह आकारास येतील. ते तसे येऊ नयेत असे या लेखातले प्रतिपादन नाही. स्वायत्त व स्वनियंत्रित स्थानिक लोकसमूह हे समाजसंघटनेसाठी पायाभूत घटक बनले तर एतद्देशीय इतिहास-परंपरा व लोकमानस यांना धरून ती गोष्ट होईल, व ज्या मूल्यांवर नवसमाजाची उभारणी करण्याचा आमचा संकल्प आहे त्या मूल्यांशी अशी रचना सुसंगतच आहे, हा मुख्य मुद्दा आहे. जातिव्यवस्थेच्या खोडयातून मुक्त झालेल्या स्वायत्त व स्वनियंत्रित जातींकडे असे 'पायाभूत घटकसमूह' म्हणून पाहता येईल व आजच्या घडीचा आरंभबिंदू म्हणून त्यांचा स्वीकार करता येईल. नाहीतरी कोणत्याही पुनर्घटनेची, अगदी क्रांतिकारक पुनर्घटनेची सुरुवातही वर्तमान वास्तवापासूनच करावी लागते.

ग्रामव्यवस्थेचा वैशिष्ट्यपूर्ण घाट हे भारताच्या सामाजिक, आर्थिक, राजकीय व सांस्कृतिक एकात्मतेचे आधिष्ठान होते व आविष्कार होता. आजही जवळपास सत्तर- पंचाहत्तर टक्के लोकसंख्या खेड्यांमधून राहते. खेडेगाव हा भारतीय समाजव्यवस्थेचा आजही पाया आहे असाच याचा अर्थ होतो. ' खेडेगाव हे एकात्मतेचे पूर्वापार अधिष्ठान राहिलेले आहे हे जाणून, त्याचे सातत्य टिकवून उद्याच्या भारताचे एकराष्ट्रीयत्व बळकट पायावर उभारावे' असे म्हणण्यात पुनरुज्जीवनवाद नाही. जातिव्यवस्थाधिष्ठित ग्रामव्यवस्थेचे पुनरुज्जीवन इष्टही नाही आणि (सुदैवाने) शक्यही नाही.

मग नव्या युगातली ग्रामव्यवस्था जुन्यातल्या कोणत्या वैशिष्ट्यांसहित पुनर्घटित करायची?

विभिन्न जातीजमातींची आपापल्या व्यवसाय-सेवांद्वारे एका अन्योन्याश्रयी, एकात्म अशा 'गाव' नावाच्या संजीवसदृश सेंद्रिय संघटनेत घट्ट गुंफण झालेली होती व त्याला एक पूर्णता होती. गावातील सर्वांच्या उदरभरणाची, रोजगाराची, स्वास्थ्याची गाव म्हणून स्वीकारलेली जबाबदारी हे त्या पूर्णत्वाचे एक अंग होते. बाहेरच्या जगाशी गावाचे अनेक व्यवहार 'गाव हे एक पूर्ण व स्वतंत्र व्यक्तित्व' या भूमिकेतून होत असत. आणि अनेक ऐहिक व धार्मिक-सांस्कृतिक प्रसंगांमध्ये गावाचे ऐक्य प्रकट होत असे, पुनःपुन्हा अनुभवले व पुनःप्रस्थापित केले जात असे.

'जातिव्यवस्थांतर्गत उच्चनीचता व स्पृश्यास्पृश्यता यांच्या मुळाशी दडपणूक आणि विषमता दडलेल्या होत्या' हे ठासून सांगत असताना ग्रामव्यवस्थेची ही वैशिष्ट्ये डोळ्याआड होतात. ही वैशिष्ट्ये कायम राखण्यासाठी दडपणूक व विषमता कायमच राखली पाहिजे वा जातिव्यवस्थेच्या चौकटीतच गाव 'पूर्णत्व असलेले सजीवसदृश संघटन' म्हणून अस्तित्वात राहू शकते असे मानण्यास आधार दिसत नाही.

जातिव्यवस्थेची चौकट व्यवहारात उखडली गेली आहे. लोकांच्या, विशेषतः कनिष्ठ जातींच्या मनातून ती उखडली गेली आहे. बारा बलुतेदारी व्यवस्थाही मोडकळीस येत आहे. शेतीतही संबंध 'यजमान व आश्रित' असे राहिलेले नाहीत. दडपणूक व विषमता अद्यापही आहेत; पूर्वीपेक्षा कदाचित अधिक निर्घृण स्वरूपात त्या आज पाहावयास मिळतील. कारण जिव्हाळ्याचे, माणुसकीचे संबंध प्रस्थापित करणारा अन्योन्याश्रय व गावपण यांच्यावर प्राणघातक आघात झालेले आहेत.

'औद्योगीकरण-शहरीकरण-केंद्रीकरण या प्रक्रियांच्या आजच्या झपाट्यात व चक्रीवादळात ग्रामव्यवस्था म्हणून काही टिकेल हे केवळ स्वप्नरंजन आहे' हा आक्षेप वरील विवेचनावर गंभीरपणे घेतला जाईल. 'औद्योगिक क्रांतीनंतरच्या गणकयंत्रांच्या नव्या युगात प्रवेश करण्याची वेळ येऊन ठेपली असताना औद्योगिक क्रांतीपूर्वीच्या काळातल्या ग्रामव्यवस्थेचा आधार घेता येईलच कसा, असाही प्रश्न उपस्थित केला जाईल.

वरील आक्षेपाचे उत्तर अनेक अंगांनी वा पातळ्यांवर देता येते व द्यावे लागेल. आज औद्योगीकरण-शहरीकरण-केंद्रीकरण या साऱ्या प्रक्रिया म्हणजे सधन पाश्चात्य अर्थव्यवस्था, उद्योगव्यवस्था व राजकीय व्यवस्था यांचे आपल्यावरील दीडशे वर्षांपासून चालत आलेले जे वसाहतवादी आक्रमण, त्याचाच पुढील विस्तार आहे व याच अंगाने त्यांच्याकडे पाहायला हवे. आमच्या समाजाच्या, त्यामधील लोकांच्या गरजा, त्यांचे निकडीचे प्रश्न यांच्या पूर्ततेमधून व सोडवणुकीमधून या प्रक्रिया निर्माणही झालेल्या नाहीत वा वेगवानही झालेल्या नाहीत. काही उत्पाती नैसर्गिक शक्ती जणू आम्हांला त्यांच्या तालावर नाचवीत आहेत. पण एक तर या शक्ती चक्रीवादळांसारख्या नैसर्गिक शक्ती नाहीत, आणि दुसरी गोष्ट, आजपर्यंत त्यांनी आमचे जे नुकसान केले आहे ते पाहता त्यांच्या तालावर नाचण्यात आपण धन्यता मानण्यासारखी दुसरी लज्जास्पद गोष्ट नाही. आपण वरील प्रकारचे आक्षेप घेतो वा प्रश्न उपस्थित करतो त्यावरून आम्ही मनाने किती पूर्णपणे गुलाम झालेलो आहोत हेच दिसून येत असते.

हा जर आमचा देश असेल, हा जर आमचा समाज असेल, तर प्रश्न, या देशातील सर्वसामान्य लोकांच्या अन्न, वस्त्र, निवारा, रोजगार, आरोग्य, मनःस्वास्थ्य व शांती या प्राथमिक गरजा प्रथमतः भागविण्याचा आहे; त्यासाठी योग्य ते मानवी आणि नैसर्गिक पर्यावरण बनवण्याचा आहे. आम्हांला अद्ययावत विज्ञान हवे ते आमच्या गरजेची शेतकी व औद्योगिक क्रांती घडवून आणण्यासाठी. ज्या प्रक्रियांमुळे आमचे प्रश्न अधिकच बिकट झाले आहेत, जनजीवन बकाल, हिंस्र व असंस्कृत बनत आहे, पाळेमुळे उद्ध्वस्त होऊन लोक सैरभैर बनत आहेत त्या प्रक्रियांना चालना देणारी आर्थिक औद्योगिक क्रांती आमच्या उपयोगाची नाही. या देशातले सत्तर-पंचाहत्तर टक्के लोक ज्या खेडेगावांमधून राहतात त्या खेडेगावांचे स्थिर पायावर नव्याने पुनर्वसन करणे, लोकांच्या उपरिनिर्दिष्ट प्राथमिक गरजांची पूर्तता तेथेच होईल अशी आर्थिक-औद्योगिक व्यवस्था निर्माण करणे ही आजची निकड आहे. आमच्या विज्ञाननिष्ठेला, सर्जक प्रतिभेला आणि कर्तबगारीला आव्हान आहे ते यासाठी अनुरूप क्रांती घडवून आणण्याचे.

> *विभिन्न जातीजमातींची आपापल्या व्यवसाय-सेवांद्वारे एका अन्योन्याश्रयी, एकात्म अशा 'गाव' नावाच्या सजीवसदृश सेंद्रिय संघटनेत घट्ट गुंफण झालेली होती व त्याला एक पूर्णता होती. गावातील सर्वांच्या उदरभरणाची, रोजगाराची, स्वास्थ्याची गाव म्हणून स्वीकारलेली जबाबदारी हे त्या पूर्णत्वाचे एक अंग होते. बाहेरच्या जगाशी गावाचे अनेक व्यवहार 'गाव हे एक पूर्ण व स्वतंत्र व्यक्तित्व' या भूमिकेतून होत असत आणि अनेक ऐहिक व धार्मिक-सांस्कृतिक प्रसंगांमध्ये गावाचे ऐक्य प्रकट होत असे, पुनःपुन्हा अनुभवले व पुनःप्रस्थापित केले जात असे.*
>
> *'जातिव्यवस्थांतर्गत उच्चनीचता व स्पृश्यास्पृश्यता यांच्या मुळाशी दडपणूक आणि विषमता दडलेल्या होत्या' हे ठासून सांगत असताना ग्रामव्यवस्थेची वरील वैशिष्ट्ये डोळ्याआड होतात.*



खेडेगाव हा पायाभूत घटक मानून राष्ट्राची पुनर्रचना करण्याची गोष्ट ही, अशा रीतीने, भारतीय एकात्मतेच्या इतिहास-परंपरेशी

सांधा जोडून एतद्देशीय मार्गाने एकराष्ट्रीयत्वाची निर्मिती करण्याच्या दृष्टीनेच केवळ इष्ट आहे असे नाही. जनसामान्यांच्या प्राथमिक ऐहिक गरजांच्या पूर्ततेच्या दृष्टीनेही समर्थ व एकात्म ग्रामव्यवस्थेची पुनर्बांधणी आवश्यक आहे.

जातिव्यवस्थांतर्गत बलुतेदारीच्या तत्त्वावर, यजमान-आश्रित पायावर गावांचे पुनरुज्जीवन आज शक्यच उरलेले नाही. शेती व उद्योग यांच्या एका नव्याच धर्तीच्या संतुलनाच्या आधारे भविष्यातील खेड्यांची उभारणी करावी लागेल. शहरी, केंद्रीभूत अर्थ उद्योग व राज्यव्यवस्था यांच्याकडून होणारी दडपणूक व पिळवणूक बंद करण्यासाठी त्यांचे संघटन अन्योन्याश्रयी, स्वावलंबी, स्वायत्त व स्वनियंत्रित स्वरूपाचे असायला लागेल. या दोन गोष्टी अलिकडच्या काळात उत्तरोत्तर ग्रामीण भागातील शेतकरी समाजाला स्पष्ट होत चालल्या आहेत.

शेतकरी समाजात वाढत चाललेली ही जाण, त्यांची एतद्देशीय पाळेमुळे, या देशाच्या मातीशी त्यांचा अनिवार्यपणे निगडित असलेला हितसंबंध, राजकारणातील त्यांचे कसब, त्यांचे संख्याबळ व त्यांची रंग ही सामर्थ्यस्थळे आहेत. नव'क्षत्रिय' नेत्यांच्या सत्ताकांक्षेच्या राजकारणात आज तो फौजफाटा म्हणून गुरफटलेला आहे. त्या गुंत्यातून जर त्याची सोडवणूक झाली आणि नवभारताच्या एका उन्नत दर्शनाने त्याच्या मनाची जर पकड घेतली तर हा वर्ग तळागाळाच्या 'शूद्रातिशूद्र' सर्व समाजांसह राष्ट्रीय पुनरुत्थानाचे एक महान आंदोलन उभे करील अशी चिन्हे दिसत आहेत. अशा राष्ट्रीय पुनरुत्थानाच्या आंदोलनातूनच भारताच्या एकराष्ट्रीयत्वाच्या निर्मितीची प्रक्रिया पूर्णत्वास जाईल.